








नोंदणी क्रं. एफ.१६०१४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष ५८ । अंक ४ । जानेवारी २००५

## अव्वल इंग्रजीतील राज्यकर्ते आणि सती

## ब्राह्मण आणि त्यांची विद्या

## लोहरांचा गांव

## प्रेमाचे प्रक्षेपण हाच तरणोपाय

## बौद्धधर्माचा हिंदुस्थानात ऱ्हास का झाला?



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५८ । अंक ४ । जानेवारी २००५
मार्गशीर्ष-पौष, शके १९२६
किंमत रु. २०/-
वार्षिक वर्गणी रु. २००/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संचालक व संपादक सहमत असतीलच असे नाहीं.

## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील के. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

प्राज्ञपाठशाळामंडळ
अध्यक्ष व विश्वस्त :
सरोजा भाटे

संपादक मंडळ :
श्री. वसंत पळशीकर, डॉ. सुधीर रसाळ,
श्री. सीताराम रायकर, श्री. यशवंत कळमकर
प्रा. यशवंत सुमंत, श्री. श्री.मा. भावे

संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

## जानेवारी २००५

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्रस्तावना*

**राम बापट**

प्राचीन ग्रीस व प्राचीन भारतीय अशा दोन्ही विचारपरंपरा सामान्यतः समाजाभिमुख व संपन्न होत्या. आपापल्या समाजातील अंतर्विरोधांची व्यापक व सखोल जाण दोन्ही परंपरांना होती. त्याचवेळी सामूहिक आणि वैयक्तिक जीवनाला भेडसावणारे प्रश्न हाताळताना सूक्ष्म विचारमंथनाची महती त्यांना उमगली होती. त्यामुळे त्यांच्या साधनेला एक कालातीत परीक्षण सहाजिकच प्राप्त झाले.

प्लेटोच्या 'द रिपब्लिक' या ग्रंथाने पश्चिमेस कित्येक शतकांपूर्वीच मोठा लौकिक संपादन केला होता. पाश्चिमात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास लिहिणाऱ्या दी-मॅकिन्टायर यांच्या मतानुसार "मानवी जीवनाकडे व समाजव्यवस्थेकडे पाहण्याचा एक नमूना म्हणून प्लेटोच्या नैतिक तत्त्वज्ञानाला पाश्चात्य व जागतिक विचारात कायमचे स्थान प्राप्त झाले आहे." (रेगे २४) जागतिक महाकाव्यात गणल्या जाणाऱ्या महाभारताची थोरवी आपण भारतीयांनी केव्हाच जाणली होती. महाभारत म्हणजे तत्त्वज्ञानात्मक, धार्मिक आणि सांस्कृतिक विचारमंथनाचा एक गहन, गंभीर असा सागर आहे, अशीच येथली मान्यता होती. परिणामी वासुदेवशरण अग्रवाल यांच्या प्रतिपादनानुसार, "साऱ्या भारतीय राष्ट्राचे जीवन – आजवर व्यासरूपी सघन वटवृक्षाच्या सावलीत नांदले." (अग्रवाल : ३ : २४५)

सामाजिक विकासाच्या एका महत्त्वाच्या संक्रमणकालीन अवस्थेत प्राचीन ग्रीसमध्ये 'न्याय तत्त्वाचे स्वरूप काय आहे?' 'न्याय्य समाजव्यवस्था म्हणजे कोणत्या प्रकारची समाज-व्यवस्था?' हे प्रश्न अटळचपणे पुढे आले. या समस्येचा मुळा-पासून फेरविचार प्लेटोच्या सॉक्रेटिसने केला. त्याने उपस्थित केलेल्या सर्व प्रश्नांचा एकत्रित विचार प्लेटोच्या 'रिपब्लिक' या ग्रंथात आढळतो. न्याय या ग्रीक संकल्पनेमध्ये बाह्य न्याय्य वर्तना-प्रमाणेच आंतरिक सचोटीचे गुण अंतर्भूत होतात. सत् तत्त्वाच्या संकल्पनेस पायाभूत स्थान देऊन प्लेटोने न्यायविषयक प्रश्नांची उत्तरे एका सुसंगत तात्त्विक दर्शनाच्या साहाय्याने देण्याचा प्रयत्न केला. प्लेटोच्या मांडणीविषयी प्राचीन ग्रीसमध्ये खूपच मतमतांतरे झाली. पण एकूण ग्रीक सांस्कृतिक विश्वात आणि विशेषतः वरिष्ठ वर्णीयांच्या जीवनसरणीत प्लेटोची विचारसरणी आदर्शभूत म्हणून मान्यता पावली.

महाभारताचा विचार केला तर परत एकदा अग्रवालांच्या शब्दात महाभारताचे सार 'धर्म' या शब्दात आहे. (अग्रवाल १:४). भारती युद्धाची कथा निमित्तमात्र होती. महाभारताचे खरे रूप धर्मसंहितेचे होते. सामाजिक विकासक्रमाच्या धारेत ज्या ज्या वेळी नवे विषय व नवे पेच खडे होत गेले त्या त्या वेळी एका समाजमान्य, प्रतिष्ठित पद्धतीस धरून महाभारताची गुंफण होत गेली. असे होता होता 'जय' नामक इतिहासाची परिणती शतसाहस्री संहितेत झाली. तत्कालीन अतिशय प्रवाही असा अर्धसहस्र कालखंडाच्या संदर्भात उपनिषदयुग व आद्य बौद्ध साहित्य यांनी धर्मविषयक उहापोहाच्या बाबतीत अडीचशे दृष्टिकोनांची गणना केली आहे. या पार्श्वभूमीवर महाभारतकारांनी धर्माची एक अभिनव व्याख्या नव्या परिभाषेत मांडली आणि तेव्हापासून धर्म शब्द भारतीय संस्कृतीचा एक कळीचा शब्द बनला.

– १ –

या सर्व गोष्टी ध्यानात घेऊन प्रस्तुत पुस्तकात चौसाळकरांनी न्याय व धर्म या दोन संकल्पनांचा अनुक्रमाने प्लेटोचे 'रिपब्लिक' व व्यासाचे 'महाभारत' या दोन ग्रंथातील विचारांच्या आधारे तुलनात्मक अभ्यास केला आहे.

आजवरच्या चौसाळकरांच्या लिखाणाचे वैशिष्ट्य असे आहे की ते राज्यशास्त्रातील चिरंतन अशा काही गुंतागुंतीच्या प्रश्नांवर मराठीतून (व इंग्रजीतूनही) सूक्ष्म विवेचन करतात. तद्विषयक सगळी माहिती तपशीलाने पण काटेकोरपणे सादर करतात. या प्रश्नांचा समकालीन संदर्भ कदापिही डोळ्यांआड करीत नाहीत. आजच्या युगधर्मातील पुरोगामी मूल्यांची बांधीलकी

* प्रा. अशोक चौसाळकर यांचे आगामी पुस्तक "धर्म व न्याय" याची प्रस्तावना






अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ते मानतात. पण त्याचवेळी कुठलाही अभिनिवेश टाकून समतोलपणाने ते आपली मांडणी करतात. प्रस्तुत ग्रंथही ह्याचा प्रत्यय आपल्याला मिळवून देतो.

या ग्रंथाच्या प्रारंभीच्याच 'दोन शब्दां'त चौसाळकरांनी केलेले विवेचनही असेच उद्‌बोधक आहे. ते म्हणतात की, "विचार आणि संकल्पना, माणसामाणसांतील परस्परसंबंधांचे नियमन व निर्धारण करतात. या नियमनात व निर्धारणात सामाजिक आणि आर्थिक शक्तींचे बलाबल महत्त्वाची भूमिका बजावते." ते पुढे म्हणतात की, "मानवी जीवनाच्या न्याय व धर्म या संकल्पनांनी अशीच महत्त्वाची भूमिका बजावलेली आहे. मानवी जीवनातील श्रेयाची कल्पना, त्याचा तत्कालीन सामाजिक व राजकीय व्यवस्यांशी असणारा तणावयुक्त संबंध व मानवी जीवन उंचावण्यामध्ये त्यांनी केलेले योगदान महत्त्वाचे आहे."

उपरोक्त लक्षणीय वस्तुस्थितीच्या प्रकाशात आपला तौलनिक अभ्यास सादर करताना काही मौलिक मुद्द्यांचे अनुसंधान चौसाळकर शेवटपर्यंत राखतात. आपल्या उपसंहारात ते मार्मिकपणे सावध राहून असे नमूद करतात की, "धर्म व राजकारण, किंवा न्याय व राजकारण यांच्यातील विकल्प किंवा दुविधा दूर करणे अवघड आहे.... या दुविधेचे स्वरूप ज्याप्रमाणे प्लेटोने ओळखले होते त्याप्रमाणे ते महाभारतातील सांख्य तत्त्वज्ञांनी ओळखले होते..... राज्यसंस्था व राजकारण यांच्या मर्यादा लक्षात घेतल्या तरी समाजाला त्यापासून सुटका नाही. कारण समाज जातीजातीत, वर्णावर्णांत आणि वर्गावर्गात विभागलेला आहे. समाजात सामाजिक आणि आर्थिक कारणांमुळे संघर्ष व वाद आहेत. या संघर्षाचे महत्त्वाचे कारण म्हणजे सत्ता व संपत्ती यांचे समाजातील विविध वर्गांत झालेले विषम वाटप आणि त्यातून निर्माण झालेली शोषणाची दीर्घ परंपरा." ते पुढे ऐतिहासिक वस्तुनिष्ट दृष्टीचे भान राखून लगेचच म्हणतात की, "न्याय व धर्म यांच्या साह्याने त्या काळातील वर्गसमाजात शोषण काहीसे सौम्य झाले असेल पण ती व्यवस्था कायम असल्यामुळे ते पूर्णतः दूर झाले नाही." मग वर्तमानकालीन संदर्भात कर्मप्रवण व आशावादी भूमिका न सोडता पण त्यावेळी अंतर्मुख होऊन चौसाळकर असा समारोप करतात की, "शोषण व शासनरहित समाजातच खऱ्या अर्थाने शोषणामुळे निर्माण झालेले संघर्ष दूर होऊ शकतात आणि पूर्ण मानवाचा आदर्श आपणास साध्य करता येतो. पण तो आदर्श आपणास कधी साध्य होईल हे सांगता येत नाही. पण सध्याच्या परिस्थितीत अभयत्व, अहिंसा, सदाचरण आणि सत्यशोधन यांचे आचरण आपल्या मनावर बिंबवून राज्यांचे व संस्थांचे शुद्धीकरण करण्याचे प्रयत्न आपण करू शकतो."

आपल्यापुढील अभ्यासाच्या उद्दिष्टांचा उलगडा करताना ते प्रारंभीच सांगतात की, "तत्त्वज्ञान व राजकारण यांच्यातील द्वैत प्राचीन ग्रीक व प्राचीन भारतीय परंपरांमध्ये कशा प्रकारे समजून घेण्यात आले, त्याचा उलगडा कसा करण्यात आला याचा अभ्यास या पुस्तकात करण्याचे योजिले आहे." त्याचवेळी त्यांनी या संदर्भातील मोहाचे म्हणा, धोक्याचे म्हणा, भान राखून एक गोष्ट आवर्जून स्पष्ट केली आहे. ती अशी की, "या तौलानिक अभ्यासाचा उद्देश प्राचीन ग्रीक व प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाचा मोठेपणा किंवा श्रेष्ठत्त्व सिद्ध करणे हा नाही. अशा प्रकारचे प्रयत्न गेली अनेक वर्षे चालू आहेत. पण त्यांचा संदर्भ जित राष्ट्रांच्या तत्कालीन सामाजिक-राजकीय गरजांशी जोडला जाऊ शकतो. (किंवा तो पाश्चिमात्य साम्राज्यशाहीने निर्माण केलेल्या प्राच्य विद्यावादाचा (ओरियंटॅलिझम्)चा आविष्कार असू शकतो."

वर्तमानकालीन विचारप्रवाहांचे चौसाळकरांचे भान सावध व संवेदनाक्षम असल्यामुळे ते पुढे असे म्हणतात की, "प्रत्येक तात्त्विक परंपरेचा तिच्या सामाजिक आणि राजकीय पर्यावरणाच्या संदर्भात अभ्यास करणे जास्त आवश्यक आहे. वेगवेगळ्या सांस्कृतिक परंपरांनी आपल्या समाजांपुढे निर्माण झालेले सामाजिक आणि राजकीय प्रश्न कशाप्रकारे सोडवले हे पाहणे जास्त महत्त्वाचे आहे." या व्यापक व निःपक्षपाती भूमिकेमुळे ते आंतरसांस्कृतिक व आंतरयुगीन तौलनिक अभ्यासात वेळोवेळी होणाऱ्या दोन चुका मोठ्या खुबीने टाळू शकले आहेत. अशा चुका स्थल-कालाच्या हाताळणीत उद्‌भवतात. कालघटकाच्या संदर्भात काही अभ्यासक ऐतिहासिक कालखंडांना पूर्णतः विलग आणि बंदिस्त मानून एका कालखंडाच्या तुलनेत दुसरा कालखंड पहावयाचेच नाकारतात. तर काहीजण दुसऱ्या टोकाला जाऊन कालक्रमाच्या सतत बदलत्या रूपाकडे कानाडोळा करून निष्कर्ष पेश करतात. दुसरीकडे कालविपर्यासाने डागाळलेल्या अवकाश नामक घटकाच्या संदर्भात काही अभ्यासक पृथ्वीच्या पाठीवरील दोन समाज वा संस्कृत्या यांची तुलना करावयाचे अजिबात नाकारतात किंवा दुसऱ्या टोकाला जाऊन एकाच मानदंडाने दोघांचीही संभावना करतात.








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खरोखरी सांभाळायला अवघड, पण समंजस मार्ग असा की सर्वच मूल्ये सर्वस्वी नवीन नसतात, पण नवनवी असतात, असे मानणे म्हणजे असे की, "इतिहासाच्या एका टप्प्यावर उभ्या असलेल्या सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाच्या संदर्भात ह्या मूल्यांचा शोध लागतो आणि परिपोष होतो. तेव्हा या, मूल्यांची आवश्यकता व प्रामाण्य समजून घेण्यासाठी त्यांच्या मागची सामाजिक आणि वैचारिक परंपराही समजावून घेतली पाहिजे." (रेगे – २) चौसाळकरांनी नेमक्या या भूमिकेचा स्वीकार केल्याने त्यांच्या या ग्रंथातील युक्तिवाद आपणास रास्त वाटतो.

याच संदर्भात चौसाळकरांनी एका महत्त्वाच्या मुद्द्यांचा धावता आढावा घेतला पण त्याचेवेळी काही एक निर्णायक निष्कर्ष काढला नाही हे बरेच झाले असे मला वाटते. मुद्दा असा, "काही अभ्यासकांच्या मते (प्राचीन ग्रीक व भारतीय) विचारपरंपरांत विचारांची देवाण-घेवाण झाली असण्याची शक्यता आहे. पण जर देवाण-घेवाण झाली असेल तर भारतीयांनी ग्रीकांचे विचार स्वीकारले की, ग्रीकांनी भारतीयांचे विचार स्वीकारले याबाबत मतभेद आहेत." या संदर्भात चौसाळकर असे म्हणतात की, "या मतभेदांचे नक्की उत्तर देणे अत्यंत अवघड आहे कारण भारतीय ग्रंथांच्या लिखाणाच्या काळाबद्दल अनिश्चितता आहे. भारतीय तत्त्वज्ञानावरील प्रमाण ग्रंथ इ.स. काळानंतर लिहिले गेलेले आहेत. प्राचीन भारताच्या सामाजिक व तात्त्विक विकासाबाबत माहिती मिळविण्याची आपली साधने तोटकी आहेत. या उलट ग्रीक पुस्तकांच्या लिखाणाच्या तारखा सर्वमान्य अशा आहेत." भारत व ग्रीस यांच्या मधल्या भूप्रदेशात तीन वेगवेगळ्या म्हणजे हिब्रू, सुमेरियन, इजिप्शियन व इराणी संस्कृत्या नांदत होत्या. तसेच भारतीय, ग्रीक व इराणियन संस्कृत्यांच्या उदयाचे स्रोत समान असावेत. असा दोन मुद्द्यांचाही निर्देश ते करतात.

उपरोक्त विवेचनाच्या संदर्भात त्यांनी सहा पाश्चिमात्त्य व दोन भारतीय विद्वानांच्या मांडणीचा दाखला दिलेला आहे. गोडोलिफन या पंडिताच्या अभिप्रायाचा संदर्भ देऊन चौसाळकर समारोप करतात की, "प्राचीन ग्रीकांचा असा विश्वास होता की, ज्ञानाचा उदय पूर्वेकडे झालेला आहे.... आपणास असेही म्हणता येईल की प्लेटोने जे भारतीय विचार स्वीकारले ते त्याने कदाचित इजिप्तच्या व इराणच्या माध्यमातून स्वीकारले असावेत, कारण भारत व ग्रीस यांचे प्रत्यक्ष संबंध नव्हते. ज्यावेळी अलेक्झाँडर इ.स.पू. चौथ्या शतकात ग्रीक भारतात आले त्यावेळी त्यांना भारत हा पूर्ण नवा देश वाटला होता."

प्राचीन संस्कृत्यांचा तौलनिक अभ्यास मी केलेला नसल्यामुळे ह्याविषयी ठाम विधाने करणे अनुचित होईल. तरी पण या संदर्भात काटेकोर संशोधनातून नव्याने प्राप्त झालेले निष्कर्ष मी नोंदवू इच्छितो. मार्टिन बर्नाल हे अभिजात समाजधारणांचे गाढे अभ्यासक आहेत. त्यांनी १९८७ साली 'कृष्णवर्णीय ॲथेना' (ब्लॅक ॲथीना) नावाचा एक ग्रंथ प्रसिद्ध केला. प्राचीन ग्रीक संस्कृती, धर्म आणि राजकारण यांची पाळेमुळे प्राचीन इजिप्तच्या संस्कृतीत किती खोलवर रुजलेली आहेत, याविषयावर बिनतोड पुराव्यांवर आधारलेली मांडणी बर्नाल यांनी केलेली आहे. खुद्द प्लेटोने इजिप्तमध्ये जाऊन अभ्यास केला होता याची दखल त्यांनी घेतली आहे. आपल्या बाजूने पाहिले तर नानाविध कारणांनी प्राचीन इजिप्त व प्राचीन भारत यांच्यातील देवाण-घेवाणीचा अभ्यास शून्यवत आहे. युरोकेंद्रित मानसिकतेतून सुटका झाल्यास ह्या समस्येवर वेगळाच प्रकाश पडण्याची शक्यता आहे.

– २ –

चौसाळकरांनी प्लेटोची न्यायकल्पना व महाभारतातील धर्मकल्पना यांचा तुलनात्मक अभ्यास कुशलतेने सादर केला आहे. एका विभागात त्यांनी प्लेटोची न्यायविषयक मांडणी केली आहे. दुसऱ्या विभागात महाभारतातील धर्मकल्पना सांगोपांग, तपशिलासह व स्वतःच्या मार्मिक निष्कर्षांसह सादर केली आहे. शेवटच्या भागात प्लेटोचा न्याय व महाभारताचा धर्म या संबंधींच्या साम्यभेदांची चर्चा करून आपले अंतिम मत दिले आहे.

प्राचीन ग्रीक समाज, संस्कृती आणि तत्त्वज्ञान समजावून घ्यावयाचे असेल तर तत्कालीन ग्रीक नगरराज्यांची व्यवस्था समजावून घ्यावी लागते. म्हणून त्यांची काही प्रधान वैशिष्ट्ये चौसाळकर सुरुवातीलाच सांगतात. त्यानंतर होमर ते सॉक्रेटिस – प्लेटोपर्यंत बदलाच्या आर्थिक, सामाजिक व राजकीय परिस्थितीचे आणि वैचारिक परंपरांचे धावते सिंहावलोकन करतात. बदलत गेलेले सामाजिक व आर्थिक अंतर्विरोध अधोरेखित करण्यावर ते रास्त भर देतात. यानंतर त्यांच्या आधीच्या सोफिस्ट तत्त्वज्ञांना कुंठित करणाऱ्या सॉक्रेटिसच्या विशिष्ट संवादपद्धतीचा उलगडा करतात. त्यामुळे सत्य, न्याय,

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सद्‌गुण आणि ज्ञान यांचा एकमेळ सॉक्रेटिस कसा साधत असे हे आपल्याला अवगत होते. राजकारणाच्या प्रत्यक्ष अनुभवांमुळे त्याविषयीची प्लेटोची जाण टोकदार बनली होती. वयाच्या चाळिसाव्या वर्षी लिहिलेल्या 'रिपब्लिक' या ग्रंथात प्लेटोने सॉक्रेटिसने प्रतिपादिलेला विचार, न्यायाचे सिद्धांत, साम्यवाद, आदर्श राज्य, तत्त्वज्ञ राजा व न्यायाची फलश्रुती या परस्परबद्ध मुद्द्यांच्या चौकटीत एकत्रितपणे सादर केला. या संदर्भात रिपब्लिकचा रचनाकाळ व रचनेच्या संदर्भात बार्कर, गिलबर्ट राईल, बेन्जामिन जॉवेट इत्यादींच्या भिन्न भिन्न मतांचा निर्देश करण्याचे चौसाळकर विसरत नाहीत.

न्यायाने वागावे म्हणजे प्रचलित कायदे, रूढी, संकेत, व्यवस्था यांना धरून वागणे की निसर्गप्रणीत वस्तुनिष्ठ अधिष्ठानावर उभारलेल्या चिरंतन अशा न्यायतत्त्वाप्रमाणे वागणे असा एक मोठा वाद तत्कालीन ग्रीसमध्ये झडत होता. त्या पार्श्वभूमीवर राज्य हा व्यक्तीचाच बृहदाकार असते आणि जे गुण राज्यात राहणाऱ्या व्यक्तींच्यामध्ये असतात ते राज्यात अभिव्यक्त होतात; म्हणून प्लेटो न्यायाचा शोध व्यक्तीमध्ये घेण्याऐवजी राज्यसंस्थेमध्ये घेतो. ही गोष्ट चौसाळकर पुरेशी स्पष्ट करतात.

आपल्या प्रतिपादनातून आपण विचारांच्या तीन लाटा निर्माण केल्या आहेत असे प्लेटोच्या सॉक्रेटिसचे मत होते. त्यांतील पहिली लाट "शिक्षणामधील समानता व स्त्रियांची व पालकवर्गाची सार्वजनिक कर्तव्ये यांच्या संबंधात आहे. प्लेटोच्या मते समानता माणसांसाठी नैसर्गिक बाब आहे. कारण ती मानवी स्वभावाशी सुसंगत आहे. विवेचनाच्या दुसऱ्या लाटेत.... प्लेटोने पालक वर्गासाठी कुटुंबसंस्थेचे उच्चाटन का व कसे केले पाहिजे याची मांडणी केली आहे. साम्यवादी समाजाचा उद्देश पालकवर्गामध्ये एकता स्थापन करणे हा आहे. विवेचनाची व चर्चेची तिसरी लाट आदर्श राज्याच्या स्थापनेबाबतची आहे. आदर्श राज्य जर स्थापन करावयाचे असेल तर तत्त्वज्ञांनी राज्यकर्ता वर्ग बनले पाहिजे. राज्यकर्त्यांनी तत्त्वज्ञानाचे शिक्षण घेतले पाहिजे असे मत व्यक्त केले आहे.... पण शेवटी न्यायाच्या राजकीय बाजूंची चर्चा करणे आवश्यक होते. राजकारण, तत्त्वज्ञान आणि आदर्श राज्य यांचा विचार त्याने त्याच्या विवेचनाच्या तिसऱ्या व सर्वात महत्त्वाच्या विचार लहरित केला आहे."

प्लेटोने आपल्या प्रतिपादनाची मांडणी तीन भागात केली. प्रथमतः न्यायाच्या पारंपरिक सिद्धांतांची चर्चा करून, चिकित्सा करून त्याने त्यांचे खंडन केले. त्याऐवजी स्वतःचा सिद्धांत मांडला. आपल्या आत्म्यामध्ये वसत असणाऱ्या गुणांच्या आधारे जीवन जगणे हा न्याय आहे अशी प्लेटोची धारणा होती. त्यानंतर अशा न्यायाच्या अंमलबजावणीसाठी अपरिहार्य असलेल्या समाजव्यवस्था आणि आदर्श राज्यव्यवस्था यांचे चित्र त्याने रेखाटले. त्याकरिता सत्संकल्पना व शिवसत्संकल्पना यांचे ज्ञान का आवश्यक आहे याची मांडणी त्याने केली. शिवसत्संकल्पनेला सत्य, न्याय व अस्तित्व यांचा आधार आहे, असे त्याचे मत होते. सरते शेवटी ज्ञानप्राप्तीमध्ये आत्म्याची भूमिका महत्त्वाची आहे असे प्लेटो विशद करतो. त्याच्या मते हरवलेल्या स्मृतीचा पुनर्लाभ म्हणजे शिव-सत्संकल्पनेचा साक्षात्कार होणे होय. आत्म्याचा प्रयत्न शरीराच्या बंधनातून स्वतःची मुक्ती करून घेण्याचा असतो व असला पाहिजे.

मानवी श्रेयाविषयीच्या प्लेटोच्या सत्संकल्पनेची अचूक जाण असल्यानेच तसेच प्लेटोने आपल्या न्यायविषयक मांडणीत शिक्षणपद्धतीला व त्याही पलीकडे जाऊन सर्व सत्‌तत्त्वांचा मूळ आधार असलेल्या श्रेयाच्या सत्‌तत्त्वाच्या विवेचनाला एवढे प्राधान्य दिले आहे याचे रहस्य चौसाळकरांना उमगलेले आहे म्हणूनच ते त्यांनी विस्तारपूर्वक मांडले आहे. यामुळेच "न्याय म्हणजे समाजातील आणि राज्यातील सर्व घटकांच्यामध्ये एकात्मता स्थापन करणे आणि ज्याच्या जवळ खरेखुरे ज्ञान आणि शहाणपण आहे त्याच्या नियंत्रणाखाली स्वखुशीने तयार असणे होय." असे वागणे ही माणसाची सहजप्रवृत्तीच आहे असे प्लेटोचे म्हणणे आपल्याला सुसंगत वाटू लागले.

चौसाळकर प्लेटोने वापरलेल्या मिथकाचे, रेषेच्या उपमेचे तसेच गुहेच्या व जहाजाच्या दृष्टांतांचे मर्म आपल्या मांडणीत जाता जाता पण रसाळपणे उलगडून दाखवितात.

प्लेटोचे 'रिपब्लिक'मधील प्रतिपादन सादर केल्यानंतर ते त्याविषयी अर्निस्ट बार्कर, जॉन वाईल्ड लेव्हिन्सन, कार्ल पॉपर, लिओ स्ट्राऊस व ॲलन ब्लूम आणि आर्विक इत्यादी अभ्यासकांनी केलेली चिकित्साही नेमक्या शब्दात सादर करतात. विशेष म्हणजे प्लेटोच्या न्याय विषयक मांडणीचे स्वतःचे मूल्यमापन ते सादर करतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे, "आपण जर आत्मज्ञान प्राप्त करून व्यापाराचा, व्याधाचा वा कसायाचा जरी व्यवसाय केला तरी आपणास मोक्ष प्राप्त करून घेता



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

येतो ही भारतीय दृष्टी आहे. 'रिपब्लिक'मध्ये ही दृष्टी आपणास दिसत नाही. याचे कारण म्हणजे आत्मज्ञानाची अशी जाण असणारा मनुष्य म्हणजे (प्लेटोच्या मते) शिक्षणव्यवस्थेच्या तिसऱ्या अवस्थेत पालकवर्गात सामील होऊ शकतो." पण त्याचवेळी समारोपात ते असे नमूद करतात की, "खरी मुक्ती राजपद स्वीकारण्यात नसून आत्मज्ञानात व शिवसत्संकल्पनाच्या भव्योदात्त अशा तेजोमय साक्षात्कारात आहे. राज्यसंस्थेच्या आणि राजकारणाच्या मर्यादा... प्लेटोने स्पष्ट केल्या आहेत." यालाच धरून आपल्या 'दोन शब्दां'त चौसाळकर आवर्जून सांगतात की, "प्लेटोने सॉक्रेटिसच्या विचारांना पुढे नेत 'रिपब्लिक'मध्ये न्यायासंबंधी एक अभूतपूर्व चर्चाविश्व निर्माण केले आहे... या ग्रंथात त्याने न्यायाने जगणे अन्यायाने जगण्यापेक्षा कसे श्रेष्ठ आहे, श्रेयस्कर आहे हे दाखविण्याचा प्रयत्न केला. राजकारणात राज्यकर्त्यास न्यायाने जगावयाचे असेल तर शिवसत्संकल्पनेचे ज्ञान आवश्यक आहे. पण त्यास राजकारणात पडून राज्य करण्याची इच्छा नाही. कारण राज्य करणे, हे त्याचे श्रेय नाही! त्यामुळे 'तत्त्वज्ञ राजा'च्या कल्पनेतील फोलपणा त्याच्या लक्षात आला होता. आदर्शराज्य स्थापन करणे शक्य नाही, पण आदर्श माणूस स्थापन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे असे तो सांगतो"

यापेक्षा भिन्न दृष्टिकोन असणाऱ्या मॅकन्टायर यांचाही प्रस्तुत संदर्भातील निष्कर्ष या मांडणीला दुजोराच देतो. ते म्हणतात की, "आदर्श समाजव्यवस्था स्थापन करणे हा प्लेटोचा कार्यक्रम नव्हता. प्रत्यक्षात अस्तित्वात असलेल्या वेगवेगळ्या समाजव्यवस्थांचे (आणि त्यांचे घटक असलेल्या वैयक्तिक जीवनव्यवस्थांचे) मूल्यमापन करण्याचा मानदंड म्हणूनच आदर्श समाजव्यवस्थेचे आपले चित्र त्याने उभे केले होते." (रेगे : २५)

– ३ –

प्लेटोच्या न्यायविषयक मांडणीचा वेध घेतल्यानंतर चौसाळकर प्रस्तुत ग्रंथाच्या दुसऱ्या विभागात महाभारतातील धर्मसंकल्पनेचा परामर्श घेतात. त्यांच्या म्हणण्यानुसार प्राचीन ग्रीसमध्ये न्यायाच्या कल्पनेस असलेले सममूल्य स्थान प्राचीन भारतात धर्मकल्पनेस देण्यात आले होते. प्लेटोच्या संदर्भात त्यांनी ज्याप्रमाणे तत्कालीन समाजव्यवस्था व तेथील बदलत्या आर्थिक सामाजिक व राजकीय परिस्थितीचे आणि वैचारिक परंपरांचे धावते सिंहावलोकन सादर केले तसेच त्यांनी महाभारतातील धर्मकल्पनेच्या संदर्भातही उपरोक्त पार्श्वभूमी थोडक्यात रेखाटली आहे. विविध तऱ्हेच्या तत्कालीन अंतर्विरोधांचेही चित्रण त्यांनी न चुकता केलेले आहे. ते लिहितात, "भारतातील सर्व सामाजिक-आर्थिक आणि राजकीय नीतिनियम या (धर्म)संकल्पने भोवती विकसित झालेले आपणास दिसतात... प्राचीन भारतातील विविध विचारप्रवाहांचा त्यात स्वीकार करण्यात आला... प्राचीन भारतातील सामाजिक आणि आर्थिक घडामोडींचा खोल ठसा महाभारतातील या विचारांवर पडलेला आपणास दिसतो."

ग्रामीण शेतीव्यवस्थेने आदिम टोळीवाल्या समाजांवर केलेली मात ही भारतातील पहिली सामाजिक क्रांती होती हे दामोदर धर्मानंद कोसंबीचे मत उद्धृत करून, प्राचीन ग्रीस सारखी गुलामगिरीची पद्धत भारतात नव्हती कारण गुलामांचे काम येथे शूद्र शेतकरी करीत होते असा महत्त्वाचा मुद्दा चौसाळकर आपल्या निदर्शनास आणून देतात. जनपदांचा ऱ्हास व साम्राज्यांचा उदय आणि त्या नंतरच्या ऐतिहासिक टप्प्यात ठोबळपणे दीड-दोन हजार वर्षे नांदलेल्या ग्रामप्रधान समाजाचा उदय या प्रक्रियांबाबत डॉ. रोमिला थापर यांचा हवाला देऊन तोवरच्या क्षत्रिय आणि वैश्य वर्णांच्या कार्यांचा व बलाबलाचा आलेख त्यांनी त्रोटकपणे पण मौलिकता न सोडता सूचित केला आहे.

बौद्ध, जैन व आजीविक तत्त्वज्ञानांनी पारंपरिक विषमतेला दिलेल्या आव्हानाच्या संदर्भात चौसाळकरांच्या मते, "धर्माचा उपयोग महाभारतातील विचारवंतांनी तीन कारणांसाठी केला. सर्व लोकांना एका सूत्रात जोडणारे राजकीय मूल्य म्हणून त्याचा उपयोग करण्यात आला. भारतातील शेती व ग्रामव्यवस्थेस पूरक अशी जी चातुर्वर्ण्यव्यवस्था निर्माण झाली होती तिला तात्त्विक व वैचारिक अधिमान्यता प्रदान करणे आणि या व्यवस्थेत राज्याचे महत्त्व प्रतिपादन करून राजनीतीचे नवे आदर्श निर्माण करणे ही इतर दोन उद्दिष्टे होती. शांतिपर्वात आणि अनुशासनपर्वात ही उद्दिष्टे साध्य करण्याबाबत विचार मांडण्यात आले आहेत."

महाभारताची उपरोक्त पूर्वपीठिका आणि उद्दिष्टे सांगताना चौसाळकरांनी वि.स. सुखटणकर, होक्किंस एम. विंटरनिट्स व्हिटोर पिसानी, लक्ष्मणशास्त्री जोशी इत्यादी मान्यवर विद्वानांच्या विश्लेषणाचीही दखल घेतलेली आहे. पुढच्या काही प्रकरणांतून त्यांनी ऋग्वेदातील ऋत कल्पना, बृहदारण्यक उपनिषदातील






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

धर्म कल्पनेचे विवेचन; धर्मसूत्रे तसेच सांख्य, बौद्ध इत्यादी दर्शने व शेवटी अर्थशास्त्र परंपरा इत्यादींचा कानोसा घेत घेत, कधी फक्त नामोल्लेख करीत आपले धर्म व राजकारण यांच्यातील अन्योन्यसंबंधांचे आकलन सादर केले आहे. महाभारतात सामील केलेल्या सांख्य तत्त्वज्ञानाचा तर त्यांनी सविस्तर परामर्श घेतला आहे.

महाभारतात विशेषतः शांतिपर्वात धर्माच्या सामाजिक व राजकीय पैलूंची विविध दृष्टिकोनांतून मांडणी झालेली आढळते. त्याची दखल चौसाळकर साधारणतः पाच घटकांच्या संदर्भात घेतात. ते घटक असे :

१) धर्म – स्वरूप व व्याप्ती. स्वधर्म – सामान्य व विशेष धर्म.
२) धर्म व राजकारण – महाभारतातील आपत्धर्माची कल्पना.
३) धर्म आणि राजकारण राज्यसंस्थेचा उदय आणि राजाची अधिमान्यता.
४) धर्म व राजकारण – मृत्युदंडाची शिक्षा.
५) धर्माचे आणि व्यक्तीच्या धर्माचे खरे स्वरूप

या संदर्भात चौसाळकर महत्त्वाचे दोन निष्कर्ष सादर करतात. पहिला मुद्दा असा की, धर्मशास्त्रांच्या प्रतिपादनानुसार "धर्माची निर्मिती सामायिक आहे. समय म्हणजे लोकांनी परस्परात स्वेच्छेने केलेला करार.... मात्र हे समय वेद, नीतिमत्ता व राज्याचे हित यांच्या विरोधी नसले पाहिजेत." या संदर्भात "धर्मशास्त्र व अर्थशास्त्र या दोन परंपरांत समन्वय स्थापन करण्यात आला. (प्रस्थापित) व्यवस्थेत फारसा बदल न करता धर्माच्या आधारे सुधारणा कशा करता येतील, माणसाला खऱ्या अर्थाने आंतरिक उन्नतीच्या दिशेने कसे जाता येईल व मानवी जीवन जास्त मौलिक व सुधारणावादी कसे बनवता येईल याचा विचार महाभारतात करण्यात आला. या सर्व नैतिक विचारात व्यक्तीचा स्वधर्म व राजाचा राजधर्म यांच्यातील सीमारेषेबाबत विचार आला." शांतिपर्वातील विविध मांडण्यांचा भर निष्कामबुद्धीने केलेल्या कर्मावर आहे.

यानंतर महाभारतात विशद केलेला कर्मसिद्धांत आणि वर्णव्यवस्था यांच्या संदर्भात चौसाळकर आपला दुसरा निष्कर्ष मांडतात. तो असा की, "महाभारतपूर्व वैदिक पारंपरिक भूमिकेच्या तुलनेत 'महाभारतातील मांडणी – अन्विक्षिकीच्या प्रभावामुळे सांख्य, योग व लोकायत यांच्या प्रभावामुळे – बरीच उदारमतवादी झाली आहे. पण शेवटी महाभारतात संपूर्ण भारतीय जनतेच्या आशा-आकांक्षांचे व विचारआंदोलनांचे प्रतिबिंत असल्यामुळे ते सर्वांसाठीच वैचारिक रणकंदनाचे क्षेत्र बनले होते. या कारणामुळे वर्णाश्रमवादी विचारांची मांडणी तेवढ्याच आग्रहाने महाभारतात करण्यात आलेली आहे." ते पुढे म्हणतात, "महाभारतकारांनी जन्मसिद्ध चातुर्वर्ण्याचा फोलपणा स्पष्ट केला आहे. पण जातीचा सामाजिक दंडक कायम होता, ही गोष्ट उरतेच. जातिमर्यादेबाहेर मोठेपणा व कौशल्य भोगू देणे परवडतच नाही. व्यक्ती मोठी होते, तत्त्वज्ञानी होते. ब्राह्मणांपेक्षा धर्मव्याध व्युत्पन्न होऊ शकतो पण त्याने कर्म मात्र पूर्वपरंपरेतच केले पाहिजे." या संदर्भात चौसाळकर दुर्गा भागवतांचा "जातीयतेची विषम नीती बौद्धिक किंवा आत्मिक समतेच्या आड येते" हा अभिप्राय उद्धृत करून "भारतीय समाजव्यवस्थेच्या पायास गेलेला तडा अशा प्रकारे महाभारतात स्पष्ट दिसतो" – असा निष्कर्ष प्रांजळपणे मांडतात.

उपरोक्त विवेचन करताना त्यांनी भृगु-भरद्वाज, पराशर-जनक, तुलाधार-जागली आणि द्युमत्सेत-सत्यवान इत्यादी संवादांमधील भूमिकांचा टकराव चांगल्याप्रकारे अधोरेखीत केलेला आहे. श्रीकृष्ण, भीष्म, विदुर आणि पाच-पांडव व द्रौपदी यांच्यात झालेल्या चर्चांचीही ते सुबोध दखल घेतात. धर्म व आपत्धर्म यांच्या स्वरूपाबाबत त्यांनी खोलवर चर्चा केली आहे आणि धर्माच्या स्वरूपाबाबत प्रेमा कंटक, भाऊ धर्माधिकारी, सदानंद मोरे यांनी जी मांडणी केली आहे त्यांचाही चौसाळकर विचार करतात.

महाभारतातील धर्मकल्पना व राजकारण यांच्यातील अन्योन्यसंबंधातून चौसाळकरांनी काढलेले अंतिम निष्कर्ष अभिनव आणि चिंतनीय आहेत. त्यांच्या मते शांतिपर्वातील राजधर्मानुशासन, आपद्धर्म व मोक्षधर्म या तीन भागांतून धर्माचे तीन दृष्टिकोन पुढे येतात. या तिन्ही दृष्टिकोनांचा समन्वय सांख्य चौकटीत मोक्षधर्मात करण्यात आला आहे. सांख्यांची सत्ताशास्त्रीय भूमिका शांतिपर्वास मान्य आहे. निष्काम कर्माची कल्पना हे सांख्यांचे योगदान आहे. श्रौतधर्मातील कर्मयोग हा त्रैवर्णिकांसाठी खुला आहे. शूद्रांना त्यास प्रवेश नाही. पण सांख्यांचा ज्ञानमार्ग सर्वांसाठी – स्त्री-शूद्रांसाठी – खुला असून त्याचा लाभ घेऊन कुणीही मोक्ष साधू शकतो. ही सांख्यांची भूमिका उदारमतवादी असून त्यावेळच्या अनुदार व वर्णवर्चस्ववादी धर्मशास्त्रांच्या भूमिका लक्षात घेता तिचे प्रागतिक रूप लक्षात येते.

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

- 'शठे प्रति शाठ्यं' हा खरा धर्म नाही. क्षमा व अहिंसा या धर्मांचे पालन केले नाही तर समाजाचे अस्तित्व कायम राहणार नाही. आत्मसंयमन, तितिक्षा आणि दम हे महत्त्वाचे गुण असून हे आत्मसात करणे गरजेचे आहे. फळावर लक्ष ठेवून धर्मसाधना करावयाची नसते. राज्याचे अनुशासन करीत असताना आपत्काली आत्मसंरक्षणार्थ अपवाद म्हणून अधर्माचा स्वीकार करावा लागतो. पण एखादा राजा जर असे म्हणू लागला की त्याने राजधर्माचे उत्तम प्रकारे पालन केले आहे त्यामुळे त्यास अंतिम श्रेय प्राप्त होईल तर ते बरोबर नाही, कारण श्रेयसाच्या धर्मासाठी त्याला तत्त्वज्ञानाची कास धरून आत्मज्ञान प्राप्त करून घेतले पाहिजे. त्यामुळेच त्याची वार्धक्य व हिंसा यातून निर्माण झालेल्या संकटातून मुक्ती होईल.

शांतिपर्वाच्या या रास्त, वस्तुनिष्ठ, समंजस आणि प्रगल्भ भूमिकेचे वर्म व मर्म तत्कालीन भारतीय परिस्थिती लक्षात घेतली तरच ऐतिहासिकदृष्ट्या आपल्या हाती येईल.

या संदर्भात चौसाळकर हे सप्रमाण सांगतात की, त्या काळात भारतीय समाजात फार मोठ्या प्रमाणात सामाजिक अभिसरणाची प्रक्रिया चालू होती. समाजाच्या एकीकरणात महाभारतात ग्रथीत झालेल्या धर्मसंकल्पनेने मोलाची भूमिका बजावली. समाजातील वेगवेगळ्या घटकांना विशेषधर्मांच्या व सामान्यधर्मांच्या मदतीने एका सूत्रात बांधण्यात आले. त्यांना अंतर्गत स्वायत्तता देण्यात आली. ही प्रक्रिया सिद्ध करण्यासाठी दार्शनिक अधिष्ठानाची गरज होती. त्यासाठी शांतिपर्वात अनेक गोष्टींचा समन्वय करण्यात आलेला दिसतो. त्यात सांख्ययोग व वेदांत यांचा समन्वय आहे. त्याचप्रमाणे अर्थशास्त्र व धर्मशास्त्र परंपरांचा समन्वय आहे. वर्णव्यवस्थेबाबत जास्त उदार व लवचिक भूमिका घेऊन गुण व जन्म यांच्या समन्वयाचा पुरस्कार करण्यात आला आहे. बौद्ध विचारांतील बुद्धिवाद, मानवतावाद, समत्व व अहिंसा धर्मकल्पनेमध्ये समाविष्ट करण्यात आल्या आहेत. राजनीतीत धर्म व राजकारण यांच्यातही समन्वय करून राज्याच्या हितासाठीची अनैतिक कर्तव्ये केवळ आपद्धर्म म्हणून करावीत असा विचार मांडण्यात आला.

प्राचीन काळापासून भारतीय समाज बहुविध व बहुसांस्कृतिक होता. त्याला उच्चतर नैतिक पातळीवर नेण्याचा प्रयत्न सम्राट अशोकाने धम्म कल्पनेच्या द्वारा केला. हाच प्रयत्न त्याच्या नंतर शांतिपर्वात चालू ठेवण्यात आला. या सर्व प्रक्रियेत शांतिपर्वाची भूमिका क्रांतिकारक असून सुधारणावादी आहे, कारण मूलभूत सामाजिक आणि राजकीय सुधारणांचा पर्याय त्यावेळी उपलब्ध नव्हता. आणि तो उपलब्ध झाला असता तरी त्याला समाजमान्यता मिळण्याची शक्यता नव्हती. त्यामुळे शांतिपर्वात सुधारणावादास पाठिंबा देण्यात आला आहे. चौसाळकरांचे वरील निष्कर्ष निश्चितच विचारार्ह आहेत.

– ४ –

प्लेटोची न्यायकल्पना व महाभारतातील धर्मकल्पना यांच्या उपरोक्त तपशिलवार आणि चिकित्सक मांडणीनंतर चौसाळकरांनी तत्संबंधित साम्यभेदाचा तुलनात्मक आढावा घेऊन प्रस्तुत अभ्यासाचा उपसंहार केला आहे. त्यांचा हा ताळमेळ मार्मिक आणि मनोज्ञ आहे.

चौसाळकर सांगतात की प्लेटोचा भर हा शास्त्रांच्या अभ्यासावर आहे तर सांख्यांचा भर हा सत्यशोधन, चित्तशुद्धी आणि आत्मसंयम यांच्यावर आहे. प्राचीन ग्रीसमध्ये निसर्ग आणि मानवनिर्मित परंपरा आणि नियम यांच्यात वाद होता. या वादाच्या पार्श्वभूमीवर तेथल्या तत्त्वज्ञानाचा विकास झाला. सोफिस्ट विचारवंत सामाजिक करारवादी व 'परंपरा'वादी होते. तर प्लेटोने 'निसर्ग'केंद्रित अधिष्ठानाचा पुरस्कार केला. उलट भारतात वेदप्रामाण्य अमान्य असलेल्या परंपरांनी विशेषतः – बौद्धांनी – सामाजिक कराराचा पुरस्कार केला. महाभारताचा मध्य मार्ग होता. श्रुतिप्रतिपादीत धर्म आणि स्मृतिप्रतिपादीत समयांवर आधारलेला धर्म यातले अंतर होता होईना कमी करण्याचे धोरण श्रुतींचा मान राखीत राखीत महाभारताने स्वीकारले.

राज्यशकट चालविण्याचे कर्तव्य आणि धर्माचे पालन यांच्यामधील पेचाची चर्चा महाभारतात जेवढ्या विस्ताराने आणि बारकाईने करण्यात आली आहे, तेवढ्या विस्ताराने आणि सूक्ष्मतेने ही चर्चा 'रिपब्लिक'मध्ये करण्यात आलेली नाही. प्लेटोने सर्वात वरच्या अशा तत्त्वज्ञाच्या हातात सत्ता दिली. भारतात राज्याची सत्ता क्षत्रियांच्या हातात देण्यात आली. शांतिपर्वाने तत्त्वज्ञाऐवजी जनकासारख्या राजर्षीची कल्पना रंगवली. पण राजर्षी हा पूर्ण मानवाचा आदर्श असू शकत नाही. त्यास अनेक वेळा अन्यायाच्या मार्गाचा स्वीकार करावा लागतो. म्हणून राजाने आपले कर्म अनासक्त व निष्काम वृत्तीने करावे असे महाभारतकार सांगतात. पण त्याने प्रश्न

पान ११ वर पुढे चालू...









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# अव्वल इंग्रजीतील राज्यकर्ते आणि सती

चंद्रकांत अभंग

इंग्रजांनी ऑक्टोबर १८१७ मध्ये पुणे शहर ताब्यात घेतले त्यावेळी जनरल स्मिथ नावाचा इंग्रज सेनाधिकारी होता. त्याच्याबरोबर मुलकी कारभार पाहण्यासाठी एलफिन्स्टन होताच. एलफिन्स्टनने जनरल स्मिथ यालाच सांगितले की, त्याच्या तैनातीत लेफ्टनंट एच.डी. रॉबर्टसन नावाचा अधिकारी होता त्याला पुण्यात कलेक्टर म्हणून नेमावे. एलफिन्स्टन म्हणतो की, रॉबर्टसन या कामाला लायक मनुष्य आहे, कारण त्याला मराठी भाषा येते, त्याला एतद्देशीयांचा स्वभाव माहित आहे, कामकाजाची चांगली जाण त्याला आहे आणि तो मनमिळाऊ आहे.

रॉबर्टसनने पुण्याहून पोक्तपणाने कारभार करण्यास सुरवात केली. एतद्देशीयांच्या भावनांची बूज राखून तो कारभार करीत असे. पुणे शहरात व आसपास दारूच्या विक्रीला त्याने बंदी घातली. जुगारी अड्डे संपविले आणि व्यभिचाराला तो कडक शिक्षा करीत असे.

तथापि हिंदुसमाजात तुरळक असे जे सतीचे प्रकार घडत त्याचा त्याला उबग येई. आज आपली समजूत आहे की, सती ही प्रथा असून विधवा झालेल्यांपैकी बऱ्याच स्त्रियांना सती जावे लागत असे. परंतु ही समजूत बरोबर नाही. सतीचे प्रकार फारच तुरळक असत. १८२१ पासुन १८२७ पर्यंत सात वर्षात पुणे विभागत फक्त १२ स्त्रिया सती गेल्या. यावरून सती ही प्रथा नव्हती असे दिसते. स्त्रिया सती जात त्या पतीनिष्ठेमुळे किंवा पतीनिधनानंतर आपली अवहेलना होईल या धास्तीमुळे किंवा कुटुंबियांच्या दडपणामुळे.

काहीही असले तरी सतीचा प्रकार हा इंग्रजांना घृणास्पद वाटे, हे बरोबरच होते. इंग्रज हे अशा समाजातून येथे आले होते की, जेथे व्यक्तिस्वातंत्र्याला सर्वाधिक महत्त्व प्राप्त होत होते. त्यामुळे पतीवरच्या निष्ठेसाठी किंवा कुलाच्या प्रतिष्ठेसाठी एका स्त्रीने आत्महत्या करावी हा प्रकार इंग्रजांना सहन होणे शक्य नव्हते. कुटुंबियांच्या दडपणामुळे स्त्रीने सती जावे हा तर खूनच होय अशी रॉबर्टसनची धारणा होती. त्याही वेळी सती जावयाचे तर सरकारची परवानगी काढावी लागे. मराठ्यांच्या काळातही सरकार अशी परवानगी क्वचितच देई. सती जाण्याचा निश्चय केलेल्या स्त्रीला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला जाई. तथापि तिचा निश्चय बदलला नाही तर परवानगी देण्यात येत असे.

सतीच्या प्रकरणात रॉबर्टसनही असे प्रयत्न केले. त्याने आणखी एक शिस्त घातली होती की सतीच्या घटनेच्या वेळी कोणी एतद्देशीय सरकारी अधिकाऱ्याने त्या ठिकाणी हजर रहावे. बरेचदा असे होई की, सती जाणाऱ्या स्त्रीला आगीची झळ लागली की, ती चितेवरून बाहेर येई. अशा वेळी तिला पुन्हा आगीत ढकलण्याचा प्रयत्न कुटुंबातील पुरुष करीत. अशी जबरदस्ती होऊ नये म्हणून सरकारी अधिकारी तेथे असावा असा नियम रॉबर्टसनने केला होता. आता आपण जी सतीची हकीकत सांगणार आहोत ती गोष्ट ११ सप्टेंबर, शनिवार, १८२३ रोजी पुणे शहरात घडली.

– २ –

राधाबाई नावाची स्त्री विधवा झाली. ही कोणत्या जातीची किंवा काय वयाची होती हे नक्की कळत नाही. पण ती बहुधा ब्राह्मण असावी. या स्त्रीचा विधवा (सती) जाण्याचा निश्चय पक्का होता. त्याप्रमाणे पतीच्या चितेवर पतीचे डोके मांडीवर ठेऊन ती बसली. असे दिसते की, चितेवर एक लाकूड व पालापाचोळा यांचे मखर बांधलेले होते. त्या मखरात ती जाऊन बसली. उद्देश असा की, आग लागल्यावर जळते मखर तिच्या शरीरावर कोसळावे व ती सबंध एकदम जळावी. राधाबाईच्या बाबतीत आगीचा हा वर्षाव तिच्यावर झाल्यावर तिला चटके सहन झाले नाहीत असे दिसते. चितेवरून उडी टाकून ती बाहेर आली. त्यानंतर पुन्हा निश्चय करून ती चितेवर चढली. परंतु आगीची धग सहन न होऊन ती बाहेर आली. यावेळी तिच्या दिराने तिला पुन्हा जळत्या चितेत लोटली. तिसऱ्यांदा ती पळत बाहेर आली तेव्हा तिथे असलेल्या काही इंग्रज पुरुषांनी तिला ताब्यात घेतले आणि दवाखान्यात पोचवले. तेथे ती दुसऱ्या दिवशी मरण पावली.[२]









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ही हकिकत 'बॉम्बे कुरीयर' नावाच्या वर्तमानपत्राने एका वाचकाच्या पत्रातून प्रसिद्ध केली; हा वाचक स्वतःला 'सती प्रथेचा कट्टर शत्रू'[३] असे म्हणवतो व त्याने सही देखील तशीच केली आहे.

ही हकिकत प्रसिद्ध झाल्यावर रॉबर्टसनने चौकशी केली तेव्हा असे कळले की, जो हिन्दी अधिकारी सतीच्या जागी हजर असायला हवा होता तो काही कारणाने तेथे गेलाच नाही. त्यामुळे झाल्या घटनेचा अधिकृत पुरावा रॉबर्टसन जवळ नव्हता. तरी त्याने संबंधित व्यक्तींना ताब्यात घेऊन त्यांच्यावर खटला भरण्याचे ठरविले. अशा वेळी अनेक लोकांनी रॉबर्टसनकडे अर्ज करून विनंती केली की, या आरोपींवर खटला न भरता त्यांना सोडून द्यावे. ह्या अर्जदारांत काही नामवंत शास्त्रीमंडळीही होती.

तेव्हा रॉबर्टसनने असे ठरविले की, डिसेंबर १८२३ मध्ये शास्त्रीमंडळींची सभा पुण्यात भरवावी, त्यांच्या पुढे सरकारचे म्हणणे मांडावे. शास्त्रीमंडळींनाच गळ घालावी की, त्यांनी हा घातक प्रकार बंद करण्यासाठी लोकांची मने वळवावीत. या सभेला फार मोठ-मोठे प्रतिष्ठित, शास्त्री हजर होते, मल्हार श्रोत्री, निळकंठ शास्त्री आणि विठ्ठल उपाध्याय असे तिघे नामांकीत शास्त्री सभेत होते. विश्रामबाग वाड्यात सरकारने शास्त्राध्ययनासाठी एक शाळा उघडली होती. त्या शाळेचे मुख्य, रघू आचार्य, हेही हजर होते.

रॉबर्टसनने असे म्हणणे मांडले की, स्त्री स्वेच्छेने सती जात असेल तर त्यास सरकारची हरकत नाही. परंतु तिला जळत्या चितेत लोटणे याला खूनच म्हणावे लागेल व त्या गुन्ह्याला योग्य ती सजा होईलच. रॉबर्टसनला विठ्ठल उपाध्याय या शास्त्रींनीच जोरदार पाठींबा दिला. त्यांनी असेही सांगितले की, चिता अशी रचावी की सती जाणाऱ्या स्त्रीला बाहेर पडावयाचे असल्यास तिला सहज बाहेर पडता यावे. एकूण शास्त्री मंडळींना हे मान्यच होते की, सती जाणे हे पूर्णपणे त्या स्त्रीच्या इच्छेवर अवलंबून असावे. मात्र एकदा सती जाण्याचे ठरविल्यानंतर जर तो निश्चय आगीच्या धगीमुळे घाबरून ती अंमलात आणू शकली नाही तर तिला बहिष्कृत करून गावाबाहेर चांडाळांच्या समाजात नेऊन सोडावे. ही कठोर शिक्षा देण्याचे कारण असे की, या शिक्षेच्या भीतीने स्त्रीने चितेतून बाहेरच येऊ नये.'[४]

या बाबतीत रॉबर्टसनने शास्त्री मंडळापुढे आपले जे म्हणणे मांडले, तो दस्तऐवज प्रस्तुत लेखकाला भारत इतिहास संशोधक मंडळाच्या जोशी (सातारा) दफ्तरात मिळाला. तो पुढे देत आहोत.

– ३ –

*।।श्री।।*

*वेदशास्त्र संपन्न समस्त शास्त्री यांचे मजलसीत कॅप्टन हेनरी डंडास रॉबर्टसन साहेब बाहाद्दर मॅजिस्ट्रेट सुभा पुणे यांचे बोलणे की जी सती भाद्रपद वद्य अष्टमी शनिवारी गेली, त्या सतीचे हाल झाले ते हाल या मजलसीत जितके आहेत, त्यांनी पाहिले असते तरी त्यांचे मनात येते की असे पुन्हा कोन्हासही होऊ नये. ये विषयी आम्हास मदत करते त्यास हाली आमचे दिलात येते की सतीजावयाचा दस्तूरं फार खराब आणि तुमचे शास्त्रात असे लिहिले नाही की सती मुकरंर जावी असेही नाही. गेल्यास चिंता नाही इतकेच मात्र आहे ऐसियास ही गोष्ट अशी पुन्हा होऊ नये यास्तव शास्त्रात जी रीत लिहली आहे त्या रीतीने जावे हल्ली शास्त्राची उलट रीत करून जातात त्यास आम्ही गैररीतीने जाऊ देणार नाही याजकरीता येविशी आम्ही सरकारात लिहून बंदोबस्त करू यांत तुम्हास वाईट लागू नये तुमचे मनात येईल की सरकार मनां करू लागल्यास निरूपाय त्यास येदिशी सरकार बंदोबस्त करू लागल्यास सरकारास अवघड नाही. परंतु सरकार असे मनात आणिते की ज्या जातीचा जो धर्म आहे तो मना करण्याचे कारण नाही. परंतु सती जाते तिचे असे हाल होतात. हे काही चांगले नाही हल्ली या मजलसीत वृद्ध आहेत त्यांच्याही दिलात आले असेल की ऐसा दुर्लौकीक होतो त्यापेक्षा बंद जाहल्यास बहुत चांगले ऐसे आले असेल ऐसियास या गोष्टीचा बंदोबस्त सरकारातून जाहल्यास आम्हास काही वाईट लागणार नाही असी सल्ला तुम्ही सगळ्यांनी दिल्यास तुमची अब्रू सारे हिंदुस्थानात बहुत होईल आणि ब्राह्मणधर्म वरकड सारे गोष्टीत दयादर्ध आहे आणि सती जाण्याविषयीचा मात्र बहूत सक्ती आहे ऐसे इतर जातीचे लोक यांचे दिलात येते आणि तुमचे शास्त्रात असे लिहिले नाही की सती गेली तीची बेअब्रू आहे व बेदस्तूर होतो असेही नाही व हाली लौकीकातही सती गेली नाही तर तीची आबरू गेली असे. कोणीही बोलत नाही असे असता हाली बायको सती जाते याची सबब तीन*

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

प्रकारची आहे. येक त्या बायकोचा भ्रतार मृत्यू पावतो ते वेळेस त्या स्त्रीस अत्यंत दुःख होऊन ती .... बहुत कठीण होऊन ती जाते व दुसरी सबब की घरामध्ये स्त्रीचा भ्रतार नीत्य म्हणत असतो की माझी मातुश्री सती गेली तीची बहुत आबरू आणी लौकीक फार चांगला जाहला असे म्हणत असतो. तेणे करून त्या स्त्रीचे मनात येत असते की कदाचित असीच गेले तर माझाही असाच लौकीक व आबरू फार होईल असे चीत्तात येऊन ती सती जाते. तीसरी सबब की आपला पती मृत्यू पावला असता आपल्यास काही आधार नाही सती जावे तर धैर्य नाही परंतु चिंता नाही मांडव अथवा कोप करून वरती लाकडे बहुत घालतात तो मांडव तोडल्यानंतर जीव काही रहावयाचा नाही व कदाचित मन फिरल्यास बाहेर निघु सकत नाही मग सती तरी होऊ. अशा तीन सबब जे बायका ...... करून जातात अैसीयांस सती जाते वेळेस तीजला मांडव करून त्याजवर फार लाकडे मोठी मोठी घालून तो मांडव तीचे अंगावर येकदा तोडुन पाडावा असे तुमचे कोणही शास्त्रात निघणार नाही शास्त्रात ईतकेच की तृणाची पर्णकुटीका करून त्यात प्रवेश करावा असे असेल आणी कदाचित त्यातून बाहेर निघाली असता त्यास थोडे प्रायश्चित देऊन पुन्हा शुद्ध करून जातीत घ्यावी असेही शास्त्रात आहे. हाली राधाबाई सती गेली तीने आपले पतीचे लोभाने त्याज बरोबर सती जावे म्हणून निश्चय करून सती गेली ते वेळेस आत जाऊन आपले हाताने अग्नी लाऊन घेतला तेव्हा अग्नीची ज्वाळा आंगास लागु लागल्या. ती आंच सोसवेना तेव्हा बाहेर निघाली ते वेळेस तीने पुन्हा हिंमत बांधोन पुन्हा त्या अग्नीजवळ आली परंतु आत जावयाची हिंमत झाली नाही असे समजोन त्या बाईचे दिर जवळ होते त्यांनी तीला जबरदस्तीने पुन्हा आत टाकली त्यास तुमचे शास्त्रात असे काही लिहिले नाही की सती बाहेर निघाली तर पुन्हा जबरदस्तीने टाकावी असे नसता हे केले हे शास्त्राच्या उलट होते याजकरीता आमचे दिलात असे मुकरर येते की हा दस्तूर बहुत खराब आहे तेव्हा असी गोष्ट पुन्हा होऊ नये व आम्हास मंजुरही आहे की असी खराब चाल पुन्हा होऊ देऊ नये यास्तव पुन्हा आम्ही असे होऊ देणार नाही राधाबाईस तीचे दिराने अग्नीत लोटल्यावर पुन्हा निघाली ते वेळेस तीचे हाल असे जाहले की तीचे अंगाची कातडी जळून मासाचे गोळे बाहेर निघाले व पायातूनही रक्त चालले हे तुमचे पाहण्यात आले असते तर तुमचेही दिलात येते की ब्राह्मणाचा दयाधर्म आहे त्याचा हा फार उलट होतो असे समजोन तेच वेळेस तुम्ही सर्वत्रांनी म्हटले असते की हे जाहले असे कदापी होऊ नये आता हाली जे मजलसीत बसले आहेत त्यांनी सतीचे हाल पाहुन व अैकोन दिलात आणीत असतील की जर (ती) करीता आपली बायको तीची माया आपल्यावर जरी बहुत आहे तत्रापी मुला लेकरांची आई ती असे हाल करून घेऊन सती जावयाची हिमत तीला होईल येक क्षण जर देखील कोणाचे दिलात येणार नाही असे नाही त्यास ज्या शकसाने हे काम केले त्यास मुकरर सजा व्हावी व आम्हावर मंजूर आहे की त्यास सजा द्यावी शास्त्रकर्ते मोठमोठे होऊन गेले त्यास बहुत दया होती त्यांणी सर्व गोष्टीचा विच्यार करून त्यात असा बंदोबस्त केला असेल की सतीच्या मनात बाहेर निघावयाचे झाल्यास तीला बाहेर निघण्यावीसी फुरसत असावी कारण की जीचे ईमान शाबुद राहात नाही तीने बाहेर नीघावे हे चांगले असे जाणोन तृणाची पर्णकुटीकेचा कायदा त्यांणी केला परंतु तुम्ही आता शास्त्राची उलट करून आपले मगरूरीने दया सोडून देऊन त्या सतीस मारता त्यास तुमचे शास्त्रात असेही आहे की सती येकवेळ बाहेर निघाली असता तीला जो वाचविल त्यास बहुत पुण्य आहे हे शास्त्रार्थ तुम्हास आम्हास ठाऊक नाही व आम्हांवर मंजुरही नाही की आम्ही तुम्हास समजवावे परंतु आम्हास मुनासब आहे की खराब दस्तूर मना केल्याने तुमचे शास्त्राची उलट होत नाही तेव्हा आम्ही ही गोष्ट होऊ देणार नाही पण तुम्ही दयावंत आहा आणि साऱ्यांचे दिलातही आहे की हा दस्तुर बहुत खराब आहे हा मोडावा परंतु तुम्हास या गोष्टीची शरम आहे याजकरीता तुम्ही आमची अर्जी अैकोन घेऊन हा दस्तुर खराब आहे हा मोडल्यास आम्हास वाईट लागणार नाही असी खातरी करावी म्हणजे येवीशीचा बंदोबस्तावीसी सरकारात लिहून पाठवू असी खातरी तुम्ही केल्यास तुमची आबरू दयाधर्म यावीसी फार होईल परंतु सती कोणतेही तऱ्हेने न जावी येवीसाची खातरी कर्णे ही तुमचे मर्जीची गोष्ट आहे आता ईतके तुम्ही समजावे की आजपासुन जी सती जाणार तीणे शास्त्राचा जो कायदा तृणाची पर्णकुटीका करून जावे. असे आहे त्या प्रमाणे जावे ते राधाबाईस जळते वेळेस तीजला हिमत जाली तसी हिमत यापाठीमागे कोणासही जाहली नसेल व पुढेही कोणास होणार नाही कारण की अर्धी जळाली असता पुन्हा अग्नी जवळ कापत कापत आली अैशीयास

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका

*हाली या मजलसीत कोण सकस आहे की ईतकी हिंमत करू शकेल सारांश हाच की शास्त्रामध्ये सती मुकरर जावी असे निघणार नाही व सती जाऊन माघारी पुन्हा निघाली असता तीजला जबरदस्तीने आत टाकून घ्यावी अगर तोडून टाकावी असेही नाही तुम्ही म्हणाल की शास्त्र नाही परंतु आचार बहुत दिवसी आहे की पुन्हा माघारी निघु देऊ नये त्यास हा आच्यार बहुत खराब आहे कारण की तुमचे शास्त्रात दुसरे आच्यार बहुत सांगीतले आहेत. ते आच्यार हाली सोडून देऊन मनस्वी अनाच्यार करीतात त्यास कोणी पाहात नाही व त्याचा बंदोबस्त करावी येवीसीची फिकीर कोणी करीत नाही सतीवीसी शास्त्रार्थ असतो त्याप्रमाणे वहीवाट करीत नाही दुसरे सती गेल्याने स्वर्गप्राप्ती आहे असे शास्त्रात लिहिले आहे असे तुम्ही म्हणाल तर निश्चये करून जी जाते आणी ईमान शाबूद राखते ती स्वर्गास जाते परंतु असी कोणी नाही की अग्नीचा स्पर्श अंगास जाल्यावर तेच ईमान शाबूद राखते असे नाही तेव्हा अग्नी स्पर्श समई बुद्धीस भ्रंश होऊन नंतर ईहलोकही नाही व परलोकही नाही असे होते अैसीयास कोणतेही माणसास हिमत नाही की आपले खुशीने अग्नीत ठरोन जळून घ्यावे असे कदापी कोणतेही घडणार नाही कोणतेही दयावंत माणसास जळण्याचे दुःख अनुभव आल्यासीवाय विच्यार करू शकत नाही अैसीयास तुमचे दिलात या गोष्टीचा विच्यार काय आला असेल तो असो परंतु आम्हावर मेहरबानी करून तुम्ही सर्वांनी मिळून असा बंदोबस्त करावा की असी गोष्ट पुन्हा आमचे दृष्टिस पडु नये त्या बायकोस पुन्हा ज्याणे टाकीली त्यास दया आहे असे कोणी बोलणार नाही व शास्त्रही टाकावी न होता शास्त्राची उलट होऊ लागल्यास आम्ही होऊ देणार नाही कदाचित शास्त्रमार्गाप्रमाणे येकाधी सती गेली आणी ती पुन्हा अग्नीतून बाहेर निघाली तर तीला जो कोणी जबरदस्ती करून आत टाकील त्या शकसास आम्ही खुनी असा जाणोन त्याचे पारीपत्य मुनासब आहे त्या प्रमाणे केले जाईल. तारीख ८ माहे अगटंबर सन १८२३ ईसवी.*

**संदर्भ ग्रंथ**

१. बॉलहेचेट, केनेथ : सोशल पॉलिसी ॲन्ड सोशल चेंज इन वेस्टर्न इंडिया (१८१७ ते १८३०), ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी प्रेस, लंडन, १९५७.

**तळटीपा :**

१. पान ७ पुस्तक (१)
२. वरील पुस्तक, पान २८३
३. तेथेच
४. पान २८६, वरील पुस्तक.

**

---

पान ७ वरून पुढे चालू...

सुटत नाही, असे चौसाळकर स्पष्टपणे सांगतात. त्यांच्या मते प्लेटोने ज्याप्रकारे शास्त्रांच्या काटेकोर अभ्यासासाठी शिक्षण-पद्धतीची व्यवस्था केली होती तसा प्रकार भारतात आपणास दिसत नाही. प्लेटोची समाजव्यवस्था जन्मनिष्ठ नव्हती. त्यामुळे शिक्षणव्यवस्था हे ग्रीकांचे महत्त्वाचे वैशिष्ट्य ठरावे. शैक्षणिक गुणवत्तेनुसार वर्गरचना करावयास तेथे अडसर नव्हता. या उलट भारतात वर्णविभाजन जन्मसिद्ध आहे. विदुर, तुलाधार व धर्मव्याध इत्यादी ज्ञानवंत संन्यासी व तपस्वी ब्राह्मणांनाही श्रेयपथावर नेतात असे दृष्टांत देऊन ज्ञानसाधनेच्या व मोक्षाच्या संदर्भात जन्मसिद्ध चातुर्वर्ण्यव्यवस्था उपयोगाची नाही, असे महाभारतकारांना सांगायचे असावे, असे चौसाळकर सुचवितात.

एकमेकांपासून मूलतः भिन्न असलेल्या सांस्कृतिक परंपरातून उदयास आलेल्या राजकीय तत्त्वज्ञानातील उपपत्तींचा अभ्यास आपणाकडे दुर्मिळ आहे. त्यातही स्वतंत्र बाण्याने आपले मूल्यमापन सादर करावयास आपले अभ्यासक बिचकत असतात. अशा परिस्थितीत चौसाळकरांनी एक मौलिक पण जटील प्रश्नावर मराठी ग्रंथ सिद्ध केला त्याबद्दल मी त्यांचे अभिनंदन करतो. आपली मांडणी साधार व्हावी याकरिता संबंधित संहितांचा त्यांनी केलेला अभ्यास आपल्याला आकर्षित करतो. एका महत्त्वाच्या विषयाची तौलनिक समीक्षा करण्याचे कठिण काम त्यांनी हाती घेतले व रास्तपणे पार पाडले याबद्दल मराठी वाचकांना मोठाच उद्बोधक आनंद वाटेल.

**संदर्भ**

१. अग्रवाल वासुदेवशरण, भारत-सावित्री (३ रे पुनर्मुद्रण), खंड १ व ३, सस्तासाहित्य, नई दिल्ली, १९८४.
२. रेगे मे.पुं., पाश्चात्य नीतिशास्त्र्याचा इतिहास, (प्रथमावृत्ती), समाज प्रबोधन संस्था, पुणे, १९७४.

**







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# जीर्णोद्धार

## लेखांक ४ : ब्राह्मण आणि त्यांची विद्या

### श्री.मा. भावे

- १ -

महादेव शिवराम गोळे (१८५२-१९०७) हे मूळचे इंदुरकडचे. त्यांचे वडील इंदूर संस्थानात महसुली खात्यात नोकरीला होते. वडील १८६९ साली वारल्यावर गोळे कुटुंब पुण्यास आले. महादेव शिवराम हे डेक्कन कॉलेजातून बी.ए. झाले. त्याच महाविद्यालयात त्यांनी तीन वर्षे उपशिक्षक (फेलो) म्हणून नोकरी केली व १८८२ साली 'सायन्स' हा विषय घेऊन ते एम.ए. झाले.

१८८२ साली ते न्यू इंग्लिश स्कूलमध्ये शिक्षक म्हणून नोकरीस लागले. १८८० साली ही शाळा सुरू झाली हे लक्षात घेतले तर जवळ जवळ सुरूवातीपासून गोळे त्या शाळेत नोकरीस होते आणि टिळक-आगरकरांच्या बरोबरीने त्यांनी शाळेसाठी कष्ट घेतले असावेत असे म्हणावे लागते. १८८५ साली फर्ग्युसन महाविद्यालय सुरू झाले. त्यात ते विज्ञानाचे प्राध्यापक म्हणून काम करू लागले. १८९५ साली आगरकर वारल्यावर ते महाविद्यालयाचे प्राचार्य झाले. त्या जागेवरून १९०२ साली ते निवृत्त झाले.

निवृत्तीनंतर इंदूर संस्थानात हरयाजवळ ते शेती करून राहात होते. इंग्रजी शिक्षणपद्धतीविषयी त्यांना इतका तिटकारा वाटत होता की, आपला थोरला मुलगा सदाशिव याला महाविद्यालयीन शिक्षण न देता त्यांनी स्वत:जवळ ठेवून शेतीतच तज्ज्ञ करण्यासाठी ठेवले होते. दुर्दैवाने हा मुलगा १९०६ साली प्लेगने वारला. त्यामुळे गोळ्यांना अतिशय निराशा वाटू लागली आणि त्या व्याकूळ अवस्थेतच १९०७ साली ते मृत्यू पावले.

गोळे हे विज्ञानाचे पदवीधर होते व विज्ञानाचे प्राध्यापक होते, हे खरे असले तरी ते शाळेत संस्कृतही शिकवत असत. त्यांनी संस्कृतची क्रमिक पुस्तके लिहिली होती आणि 'अमरसार' नावाची अमरकोशाची संक्षिप्त आवृत्ती काढली होती. 'हवा' (१८९१) आणि 'मराठी सहावे पुस्तक ऊर्फ शास्त्रीय विषयांचा समुच्चय' (१८९६) ही त्यांची विज्ञानावरची शालेय पुस्तके. १८९५ साली त्यांनी 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' हे पुस्तक लिहिले व १८९८ साली 'हिंदूधर्म आणि सुधारणा' हे पुस्तक प्रसिद्ध केले.

'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' या पुस्तकाचे विस्तृत परीक्षण लो. टिळकांनी 'केसरी'तुन १८९६ साली केले. या विषयावर त्यांनी सात लेख लिहिले. त्या वेळच्या सुशिक्षित मंडळीत या पुस्तकाची मोठी प्रसिद्धी होती. पुढे १९३२ साली मुंबई विद्यापीठाने हे पुस्तक बी.ए. (मराठी)च्या अभ्यासक्रमात लावले. त्याची दुसरी आवृत्ती 'महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लिमिटेड, पुणे' यांनी काढली. या आवृत्तीला ना.गो. चापेकर यांची प्रस्तावना आहे. या आवृत्तीची ३२६ पाने असून किंमत ५रु. आहे.

पहिल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेत गोळ्यांनी म्हटले होते की, 'पुस्तक वाचून संपल्यावर व ज्या गोष्टींचा विचार करावासा वाटेल त्यांचा विचार झाल्यावर, सर्वांनी आपापले अभिप्राय मला कळविण्याची तसदी घ्यावी; कोणीही उतावीळपणे किंवा आवेशात हे अभिप्राय लिहू नयेत, स्वस्थपणे व शांतपणे मनाचा निश्चय झाल्यावर ते लिहावे अशी सर्वांस विनंती आहे'. दुसऱ्या आवृत्तीच्या प्रकाशकांनी तळटीपेत म्हटले आहे की, 'आजही कोणी असे अभिप्राय कोणी आम्हास कळविण्यास प्रकाशक ते छापून प्रसिद्ध करण्यास तयार आहेत.' परंतु कोणी असे अभिप्राय पाठविल्याचे दिसत नाही.

प्रस्तावनेच्या अखेरीस गोळ्यांनी आवर्जून लिहिले आहे की, 'डेक्कन एज्युकेशन सोसायटीचा एक मेंबर या नात्याने मी हा ग्रंथ प्रसिद्ध केलेला नाही; व सोसायटीच्या इतर सभासदांस या ग्रंथातील मते कितपत मान्य होतील हे मला मुळीच सांगता येत नाही. सबब टीका करणारांनी ग्रंथातील मतांबद्दल मला स्वतःस जबाबदार धरावे, इतरांस धरू नये'.

- २ -

१८५७ मुंबई विद्यापीठ स्थापन झाल्यानंतर पाश्चात्त्य ज्ञान इंग्रजी भाषेतून इथल्या जनतेला शिकवायचे, हा उपक्रम चालू झाला. पहिली ते चौथी या प्राथमिक इयत्तांतून मराठीतून सर्व विषय शिकविले जात. इंग्रजी सातव्या इयत्तेच्या अखेरीस









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'मॅट्रिक्युलेशन' व 'स्कूल फायनल' अशा दोन परीक्षा असत. 'मॅट्रिक्युलेशन' ही परीक्षा उत्तीर्ण होणाऱ्या विद्यार्थ्यांनाच महाविद्यालयात शिक्षणासाठी जाता येई. 'स्कूल फायनल' ही परीक्षा नोकरी करू इच्छिणाऱ्या उमेदवारांसाठी असे. या परीक्षेत उत्तीर्ण झाले तरी महाविद्यालयात जाता येत नसे.

'मॅट्रिक्युलेशन' ही परीक्षा विद्यार्थ्यांना फार अवघड जाई. निकाल कठीण लागत असे. तीस टक्के विद्यार्थी उत्तीर्ण झाले तरी डोक्यावरून पाणी गेले, असे समजत. या परीक्षेसाठी गणित हा विषय अनिवार्य होता. गणितात २५ गुण मिळाले तरी विद्यार्थी उत्तीर्ण समजला जाई. पण तितके गुण मिळणेही बिकट जाई. त्यामुळे 'मॅट्रिक्युलेशन' परीक्षेपाशी बहुतेक विद्यार्थ्यांचे शिक्षण विराम पावे. जे विद्यार्थी महाविद्यालयात जात तेही दर वर्षी होणाऱ्या विद्यापीठाच्या परीक्षेत टक्के-टोमणे खात खात ५-७ वर्षांनी पदवीधर होऊन बाहेर पडत. सारांश, मुळात शिक्षणाच्या सोयी, म्हणजे शाळा, तुटपुंज्या. त्यात उत्तीर्ण होणारे विद्यार्थी तुरळक. अखेर पदवीधर होणाऱ्यांची संख्या तर अगदी नगण्य असे.

इतक्या आटापिट्यानंतर जे पदवीधर होत ते पदवी मिळाल्यानंतर ४-५ वर्षातच मृत्युमुखी पडत. तरुण पदवीधरांच्या मृत्यूची संख्या इतकी मोठी होती की, १८९४-९५ साली या विषयाची जाहीर चर्चा सुरू झाली. त्या वर्षीच्या पदवीदान समारंभात व्याख्यान देताना पहिले देशी कुलगुरू भांडारकर यांनी या विषयाला हात घातला. भांडारकरांचे म्हणणे असे होते की, हिंदू पदवीधर लवकर मरण्याचे कारण बालविवाह, अनारोग्यकारक जीवन-पद्धती इत्यादी दुष्ट प्रकार हे होत. यावर रा.ब. रानडे यांनी असा प्रतिवाद केली की, जुन्या रूढी व वाईट सवयी यांचा परिणाम साऱ्या समाजावरच होत असतो. पदवीधरातील मृत्यूचे प्रमाण जास्त असल्याचे कारण त्यांच्यावर पडणारा अभ्यासाचा अवाजवी बोजा हे आहे. याच सुमारास (१८९६ साली) प्रा. गोखले यांनी मुंबईतील एका भाषणात सांगितले की, 'हल्लीचे जे विद्यार्थी कॉलेजात येतात त्यांच्या बुद्धीचा हळू हळू ऱ्हास होत आहे. पूर्वीच्या विद्यार्थ्यांसारखी त्यांची बुद्धी तरतरीत नाही'.' अशा रीतीने १९व्या शतकाच्या शेवटच्या दशकात नवीन शिक्षण-व्यवस्थेतून बाहेर पडणाऱ्या तरुणांच्या शारीरिक व बौद्धिक आरोग्याविषयी विचारी माणसात काळजीयुक्त चर्चा सुरू झाली होती. त्या पार्श्वभूमीवर प्राचार्य गोळ्यांचे हे पुस्तक वाचले पाहिजे.

तरुणांच्या शरीराचा व बुद्धीचा जो क्षय होत होता त्याचे मुख्य कारण शाळातील असमाधानकारक शिक्षणपद्धती हे होय, असा गोळ्यांचा ठाम निष्कर्ष आहे. शाळातून विषय विवेचून शिकवण्याचा प्रघातच नव्हता. मुलांनी घरीच जमेल त्या रीतीने अभ्यास करावा. वर्गात शिक्षकाचे काम फक्त प्रश्न विचारून मुलांनी अभ्यास केला आहे की नाही, ते पाहण्याचे. 'बहुतेक सर्व हिंदू शाळात मुले एका वाटोळ्या ओळीत बसविण्याची चाल आहे... या व्यवस्थेचा जो मुख्य गुण तो हा की, प्रश्न विचारण्यास व नंबर देण्यास ही व्यवस्था अत्यंत सोयीची असते; व प्रश्न विचारून नंबर देऊन मुलात जशी चलाखी ठेवता येते तशी दुसऱ्या कोणत्याही रीतीने ठेविता येणार नाही.' (२६) शिक्षक पहिल्या क्रमांकापासून प्रश्न विचारण्यास सुरूवात करी व बरोबर उत्तर येईपर्यंत एका खाली एक क्रमांकापर्यंत प्रश्न विचारला जाई. जो मुलगा बरोबर उत्तर देई तो पहिल्या क्रमांकावर येऊन बसे व बाकीचे खाली सरकत. चुकीचे उत्तर देणाऱ्या विद्यार्थ्यांना शिक्षक कधी कधी अतिशय क्रूर शिक्षाही देत. वर्गात काहीच शिकविले जात नसल्याने मुलांना घरीच जमेल तसा अभ्यास करून उत्तरांची तयारी करावी लागे. ब्राह्मणादी जातीतील कुटुंबात मुलांचा अभ्यास करून घेणारी वडीलमाणसे बहुधा असत. 'ज्यांमध्ये हा उद्योग नाही व ज्यास ही साधने नाहीत ती कनिष्ठ जातीची कुणबी, मुसलमान वगैरेंची मुले, वर्गात मठ्ठची मठ्ठच राहतात. ब्राह्मणांच्या शाळात त्यांना उपयुक्त असे काहीच मिळत नाही व ती लवकरच विद्येचा नाद सोडून शाळेतून पळ काढतात. एक तास शिकविण्यास तर दहा तास घोकवून तयार करून घेण्यास....' (२९)

शाळातून 'अभ्यास' या शब्दाचा अर्थ 'क्रमिक पुस्तकांची घोकंपट्टी' असा झाला होता; कारण शिक्षकांनी विषय समजावून दिला पाहिजे, ही कल्पनाच नव्हती. 'मराठी व इंग्रजी शाळात बारा वर्षे अध्ययन केल्यावर विद्यार्थ्यांच्या एकंदर ज्ञानाची परीक्षा केल्यास, त्यास फारच थोडे येत आहे असे दिसून येते. शिकलेल्या पुस्तकांपलिकडे त्यास फारच थोडी माहिती असते; शिकलेल्या पुस्तकांपैकीही पुष्कळ भाग केवळ घोकून तयार केलेला असल्यामुळे अल्पकाळात तो नष्ट होतो.... तसेच या इतक्या वर्षात मुलांची अवलोकन शक्ती पूर्णपणे वाढावी, त्यांस ज्या गोष्टी शिकविण्याचे कारण नाही त्या आपोआप समजून याव्या, ज्या शिकविल्या त्या ठिकठिकाणी कशा लागू



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पडतात ते ध्यानात यावे, व एकंदरीत त्यांची बुद्धी प्रौढ व्हावी. परंतु चांगल्या बुद्धिमान मुलांच्या अंगीही हे गुण आलेले दिसत नाहीत. उलट मुलांची अवलोकन-शक्ती नाहीशी होते, त्यांच्या अंगची साहजिक जिज्ञासाही नष्ट होते, ती अत्यंत परतंत्र बुद्धीची होतात, असा सर्वत्र अनुभव आहे' (३०-३१).

महाविद्यालयात येणारा विद्यार्थी शाळेत अंगी जडलेल्या दोषांसकट आलेला असल्याने त्याच्यात काहीच सुधारणा होत नसे. 'गणितात ज्यांची बुद्धी चालते अशांची संख्या फारच कमी, त्यामुळे गणित विषयातील भिन्न भागांची निव्वळ घोकून तयारी करणारेच फार; या बाबतीत विद्यार्थ्यांची निकृष्ट स्थिती पहावतही नाही. संस्कृतासारख्या सुगम विषयातही मुळात भाषांतर सांगितले पाहिजे; मग ते घोकून मुले परीक्षेस तयार होतात. इंग्रजी व इतिहास या विषयांची तयारी होण्यास शिक्षकाने 'अथ' पासून 'इती' पर्यंत 'नोटा' व सारांश काढून ते वर्गात सांगत बसले पाहिजे. हीच सर्व विषयांची स्थिती. नवीन विषयात साहजिक गोडी नाही, विषय समजावून घेण्यापेक्षा 'पाठ काय करावयाचे' हे समजावून घेण्याविषयी अधिक उत्सुकता व अशा कामी विद्यार्थ्यांस उत्तम मदत करील तो उत्तम शिक्षक!' (४२)

शिक्षणाचे जे व्यवस्थापन होते, तेही या अनर्थाची दखल घेत नव्हते. मराठी शाळांतील परीक्षा घेण्यासाठी सरकारी दिपोटी येत. शिक्षण कशा प्रकारे चालले होते, हे त्यांना कळत नव्हते, असे नाही. 'जेव्हा इन्स्पेक्टर किंवा डेप्युटी यांजपासून या (शिकविण्याच्या) पद्धतीत फरक होण्याबद्दल कोठेही सूचना, प्रयत्न किंवा सक्ती झालेली दिसत नाही, तेव्हा हीच पद्धती विद्याखात्याने उत्तम ठरविली आहे, असे मानणे भाग पडते.' (२७) माध्यमिक शाळात विद्यार्थी आपणाकडे ओढण्याची स्पर्धा चालत असे. 'या शाळांचे व्यवस्थापक हमरस्त्यावर मोठ्या जाहिराती लावून पालकास कळवितात की, 'एका वर्षात तीन इयत्ता', 'दोन वर्षात पाच इयत्ता' इत्यादी... (पालकास) दुसरे आमिष असते ते फीचे. फी काय ती 'चार आणे', 'सहा आणे', इत्यादी.... कोणत्याही योग्यतेच्या मुलास काहीही शिकवावयास सांगा, या व्यवस्थापकांची तयारी दिसते.... मुलगा वरच्या इयत्तेत चढविण्याबद्दल फार झाले तर प्रसंगी थोडी विशेष फी मात्र मागतील, परंतु मग त्यांची बिलकुल खळखळ नाही' (४८) परिणाम असा होई की, अभ्यास न करताही मुले मॅट्रिक पर्यंत जात व मग तुंबून राहात. महाविद्यालये बदलून जाणारी मुलेही असत. 'अ' या महाविद्यालयात पूर्व परीक्षेत अनुत्तीर्ण असणारा विद्यार्थी दुसऱ्या महाविद्यालयात जाऊन नशीब अजमावून पाही.

ही शिक्षण-पद्धती सुरू झाली तेव्हा पहिल्या दोन-तीन पिढ्यात तिचे दुष्परिणाम दिसून आले नाहीत. याचे कारण, काळ लोटत गेला तशी शिकवण्याची पद्धत आणखी वाईट होत गेली व अभ्यासाचा आणखी भार विद्यार्थ्यांवर पडत गेला. शरीराने व मनाने विद्यार्थी पिळून जाऊ लागले. दुसरे असे की, पूर्वी पालक आपली मुले उशीराने शाळेत पाठवीत. मॅट्रिकच्या वर्गात वीस-बावीस वर्षांचा विद्यार्थी दिसणे ही अपवादाची स्थिती नव्हती. आता लहान मुले शाळेत येतात व अपरिपक्व वयात या जाचक शिक्षणपद्धतीला ती सामोरी जातात. त्यामुळे शरीराने व मनाने खचून जातात. साहजिक अशा चरकातून पदवीधर होऊन आलेला मनुष्य निस्तेज, उत्साहशून्य व झडझडून काम करण्यास नालायक होऊन जाई.

– ३ –

इंग्रजी शिक्षण हे केवळ पाश्चात्य विद्यांचे इंग्रजीतून दिलेले शिक्षण नव्हते; गोळे, आगरकर यांच्या पिढीच्या दृष्टीने ते शिक्षण म्हणजे एक भारून टाकणारा ध्येयवाद होता. एकोणिसाव्या शतकाच्या मध्याला इंग्लंडमध्ये औद्योगिक क्रांती व तिच्या अनुषंगाने येणारी बूर्झ्वा संस्कृती उत्कर्षाच्या शिखराला पोचली होती. व्यक्तिस्वातंत्र्य, समता, न्याय, विचाराला विवेकाचे अधिष्ठान, नीतिमत्ता, विचार व भाषण स्वातंत्र्य, व्यक्ती व समाज यांतील संबंध व्यक्तिमूलक ठेवण्याचा आग्रह, सामाजिक व राजकीय क्षेत्रातून धर्माची हकालपट्टी अशी या संस्कृतीची नाना वैशिष्ट्ये होती. या संस्कृतीचा असा विश्वास होता की, समाजात जाणीवपूर्वक बदल घडवून आणता येतो आणि कायदा व शिक्षण ही समाजपरिवर्तनाची दोन परिणामकारक साधने आहेत. या संस्कृतीची धन्यता गाणारे ग्रंथ, लेख, नियतकालिके, कथा-कादंबऱ्या यांची इंग्लंडमधील सत्ताधारी वर्गात फार चहा होती. इंग्लंडमधील सत्ताधाऱ्यांनी इकडे पाठविलेले अधिकारी, प्राध्यापक, न्यायाधीश इकडे येत ते अशा भावनेने की, आपण एका नव्या संस्कृतीचे प्रतिनिधी म्हणून इथे आलो आहोत आणि अंधश्रद्धा, पुरातन रूढी यांनी जखडल्या गेलेल्या पारंपरिक समाजाला आधुनिक जगात आणून सोडण्याचे महत्कार्य आपणास पार पाडायचे आहे.

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

साहजिकच इंग्रजी शिक्षण घेतलेल्या पहिल्या काही पिढ्यांवर या बूर्ज्वा संस्कृतीच्या झगमगाटाचा विलक्षण प्रभाव पडला होता. आपले कुटुंब, आपला समाज, आपला धर्म या सर्व बाबतीत कालबाह्य विचार व संबंध यांची पसरलेली कोळीष्टके नवीन विचारांच्या झोतांनी झटकून काढली पाहिजेत असा हुरूप या पहिल्या पदवीधराना वाटत होता आणि त्यांच्या वर्तनाकडे त्यांचे कुटुंब व समाज भयचकित लक्ष ठेवून होते. गोळे सांगतात, 'वीस वर्षांपूर्वी जेव्हा अशाच विद्वानांचा समाजात भरणा होऊ लागला होता, तेव्हा या समाजास उकळी येते की काय, असे वाटत होते. नव्या नव्या चळवळी सुरू होत होत्या, नवीन नवीन समाजहिताचे प्रश्न वादविवादात येत होते, जुन्यांच्या किंवा नव्यांच्या चित्तात शांतता किंवा समाधान नव्हते. कॉलेजातून विद्या संपादन करून येणारा मनुष्य कुटुंबात कोणत्या नव्या कल्पना आणील, धर्माचे कोणत्या बाबतीत उल्लंघन करील, समाजाच्या कोणत्या रूढी झुगारून देईल, कोणते सद्‌गुण किंवा दुर्गुण व्यक्त करील या सर्व गोष्टींबद्दल कोणास काही भरंवसा नसे व इष्टमित्र, आप्तबंधू व सर्व समाज मोठ्या उत्सुकतेने हा काय करितो म्हणून वाट पहात असे.' (१३८)

पदवीधरांच्या पहिल्या पिढ्यांनी समाजपरिवर्तनाची ही जी ईर्षा दाखवली होती, ती प्राचार्य गोळ्यांना १८९६ सालच्या शिक्षितांच्या आमदानीत खुरटून गेल्यासारखी वाटत होती. नवीन विचारांचा जोम, आपल्या भवितव्याचे आपण शिल्पकार आहोत हा आत्मविश्वास, 'प्राप्तकाळ हा विशाल भूधर, सुंदर लेणी तयात खोदा' हा उत्साह, यांचा मागमूस उरला नव्हता. पदवीधरांचा हा समाज पंचवीस वर्षातच उतरणीला लागल्या सारखा झाला होता. त्याला जीर्णावस्था प्राप्त झाली होती. 'कोणीही ग्रॅज्युएट झालेल्या नव्या मंडळीस स्वतंत्रपणे निबंध लिहिण्यास किंवा बोलण्यास सांगावे; शेकडा दहा-पाचच तो लिहिण्याचा हिय्या करतील. विषय राजकीय, सामाजिक, धर्मसंबंधी किंवा दुसऱ्या कोणत्याही सुधारणांविषयी असावा... अशा निबंधात मतवैचित्र्य होण्यास पुष्कळ अवकाश आहे; परंतु ते झालेले दृष्टीस पडणार नाही. आम्ही आहो या स्थितीत सर्व राजकीय हक्कांस पात्र आहो; आम्ही आहो त्या सामाजिक स्थितीत क्षुल्लक फरक केले म्हणजे बस्स आहे; आमचा आहे हा धर्म, आचार, उद्योग, क्रम यापैकी कोणता एकही फारसा सुधारण्या सारखा नाही... अशी सामान्यतः मते येतील.... सर्व प्रकारचे स्वातंत्र्य असून कल्पना व विचार यांचे वैचित्र्य नष्ट व्हावे, आचार व उद्योग यात फरक पडत जाऊ नये, केवळ निरर्थक पिष्टपेषणात व चर्चित-विषयात सुशिक्षितांचा सर्व वेळ जावा, याहून अधिक शोचनीय स्थिती ती कोणती?' (पान १४६-४७).

प्राचार्य गोळ्यांच्या निराशेचे मर्म वरील परिच्छेदातून व्यक्त झाले आहे. नवीन पदवीधर शारीरिकदृष्ट्या खचलेले आहेतच पण समाजपरिवर्तनाविषयी कोणतीही उभारी त्यांच्या मनात उरलेली नाहीत. इंग्रजी शिक्षणातून कोणतीही प्रेरणा त्यांनी घेतली नाही. ते स्थितीवादी झाले आहेत हे त्यांचे दुःख आहे. या नवशिक्षित समाजाला त्यांनी 'ब्राह्मण' हे नाव दिले आहे. या गोष्टीचा खुलासा करताना गोळे प्रस्तावनेत लिहितात, 'साधारणपणे 'ब्राह्मण' हा शब्द पांढरपेशे लोकांचा थोडक्यात उल्लेख व्हावा म्हणून योजिला आहे. देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे आणि सारस्वत ब्राह्मण, कायस्थ आणि पाठारे प्रभू व दुसऱ्या शुद्ध विद्याव्यासंगी जाती असतील, त्या सर्वांचा ब्राह्मण या शब्दात समाहार केलेला आहे असे समजून पुस्तक वाचावे."

परंतु गोळ्यांनी वापरलेला 'ब्राह्मण' हा शब्द गैरसमज निर्माण करणारा आहे. 'त्यांची विद्या' या शब्दातील विद्या ही संज्ञा इंग्रजी विद्येला उद्देशून आहे हे स्पष्ट आहे. पण 'ब्राह्मण' या सदराखाली त्यांनी ज्या जाती उल्लेखिल्या आहेत त्या जातीतील सारे पुरुष इंग्रजी विद्या घेत होते असे नाही. १९११ सालच्या खातेवारीवरून असे दिसते की, अशा जातींपैकी फक्त १२% पुरुषांपर्यंत इंग्रजी शिक्षण पोचले होते. ही गोष्ट खरी की, इंग्रजी शिक्षण घेणाऱ्यात गोळे ज्यांना ब्राह्मण म्हणतात अशांची संख्या ९०% हूनही जास्त असावी. तरी, गोंधळ टाळण्यासाठी गोळ्यांनी इंग्रजी-शिक्षित समाजाला 'ब्राह्मण' असे संबोधावयास नको होते. पुस्तकाच्या उरलेल्या भागात त्यांनी ब्राह्मणांविषयी जे, बहुतेक टीका करणारे, लिहिले आहे, ते सर्व ब्राह्मणांना लागू आहे की, इंग्रजी-शिक्षित लोकांविषयी आहे, ते कळण्यास काही मार्ग राहिलेला नाही. असो.

– ४ –

गोळ्यांनी ब्राह्मण समाजाच्या विविध दोषांवर कळकळीने पण कठोर शब्दात टीका केली आहे. कर्तबगारी व उद्योग यात ब्राह्मणांचे पाऊल मागे पडत आहे. 'एकंदर सर्व ब्राह्मणमंडळी विद्येच्या का मागे लागली आहेत? विद्येत यश येवो वा न येवो,

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ती केवळ विद्याव्यसनी का बनली आहे? विद्येवाचून दुसरा तरणोपायच नाही अशी या बुद्धिमान ज्ञातीची का स्थिती व्हावी? या गोष्टीचा विचार करता एक चमत्कारिक कारण ध्यानात येते. ते असे की, या ज्ञातीच्या अंगची कर्तबगारी आणि उद्योग पूर्णपणे नाहीसा झाला आहे, त्याचा हा परिणाम होय.' (१५१) व्यापार, नवे उत्पादक उद्योग, तंत्रज्ञान, परदेश-गमन इत्यादी अनेक क्षेत्रांतून जाण्यास ब्राह्मण उत्सुक नसतात, असे गोळ्यांचे निरीक्षण आहे.

'याप्रमाणे ब्राह्मणांच्या हातून व्हायचे नाहीत असे उद्योग काढून टाकता टाकता काय शिल्लक उरते? लिहिण्या-वाचण्याची सरकारी नोकरी किंवा तशीच खाजगी नोकरी, वकिली, डॉक्टरी, इंजिनियरी, इत्यादी म्हणजे ज्या कामास बुद्धीचा खर्च फार, शारीरिक श्रम बेताचे. या स्थितीवरून असे सिद्ध होते की, ब्राह्मण जातीय कर्त्या पुरुषांपैकी नव्वद हिस्सा लोकांस परतंत्र झाल्यावाचून इलाजच नाही, मग त्या पारतंत्र्यास बुद्धीच्या श्रमांची जी किंमत येईल ती येईल.' (१५२-५३). यात मुख्य नोकरी देणार म्हणजे सरकार. ब्राह्मण सरकारी नोकर वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या दराऱ्याखाली मान घालून वावरत असतात, असे गोळ्यांचे अवलोकन आहे. 'कोणत्याही बाबतीत सरकार जे काम करील त्यांविरुद्ध अक्षर काढायचे नाही, अशा शर्तीवर ब्राह्मण लोकांनी नोकरी धरलेली असते.' (१४९)

इतके असून ब्राह्मणजातीयच अनेक लोक स्वातंत्र्याच्या गप्पा मारून-बहुधा शाळकरी मुलांच्या-टाळ्या मिळवीत असतात. 'आम्ही सरकारी नोकरीतही राहू व स्वातंत्र्यदेखील मिळवू, ही ब्राह्मण जातीची बढाई फोल आहे'. 'ज्या समाजास नवे हक्क मिळवावयाचे असतील त्यात इतके लोक स्वतंत्र पाहिजेत की, ते सरकारी नोकरीत असलेल्या बाकीच्यांचे व त्यांच्या कुटुंबांचे प्रसंग पडल्यास पोषण करू शकतील. म्हणजे निदान निम्मे लोक तरी स्वतंत्र उद्योग करणारे पाहिजेत..... ही ब्राह्मणांची जोवर स्थिती नाही, जोपर्यंत जुलमाकरिता शिक्षा देणाऱ्यांपेक्षा नोकरीकरिता दात विचकणारे ब्राह्मणच राज्यकर्त्यांच्या अधिक अवलोकनात येतात तोवर ब्राह्मणांचे राजकारणी परिश्रम सरकारच्या इच्छेविरुद्ध असतील तर ते त्यांच्या स्वतःच्या अहितास किंवा निदान उपहासास कारण होतील. हल्ली ज्या स्थितीत ब्राह्मण आहेत त्या स्थितीत त्यांनी कोणतीही महत्त्वाची प्राप्ती करून घेतल्यास तो एक चमत्कारच गणिला पाहिजे'. (१५१)

सरकारी नोकरीत शिरलेले हे ब्राह्मण खेड्यापाड्यात जाऊन अंमलदार म्हणून मिरवितात, पण गोरगरीब रयतेच्या उत्कर्षासाठी ते काय प्रयत्न करतात? 'खेड्यापाड्यातील अंमलदार व इतर ब्राह्मण मंडळी रयतेच्या खऱ्या सुधारणेस व सुखास क्वचितच कारण होते. याविरुद्ध तिचे आचरण असल्याची उदाहरणे फार. साहेबास खुष करण्याकरिता किंवा आपली नोकरी राखण्याकरिता अमूक माणूस निष्कारण जुलूम करणार नाही अशी खात्री ज्याविषयी रयत देईल असा ब्राह्मण अंमलदार सापडणे मुष्किल... कनिष्ठ प्रतीच्या ब्राह्मण नोकरांची सदाचाराबद्दल व नीतीबद्दल लोकात ख्याती नाही, उलट बोभाटाच आहे. जे चांगले शिकलेले ब्राह्मण अंमलदार येतात, ते स्वधर्माचे आहेत असे ओळखण्यासही फार थोडी साधने असतात. कारण त्यांच्या स्वतःच्या नित्याचारात हिंदुधर्म फारच थोडा दृष्टीस पडतो.' (२०७)

'पुष्कळ विचारी पुरुषांस ब्राह्मणांच्या हरतऱ्हेच्या निष्फलता व प्रसंग विशेषी दुष्परिणाम दाखविले असता त्यांचे जे ठराविक उत्तर येते, ते हे की, हा अवस्थांतराच्या मधला काळ आहे; यात असेच व्हावयाचे.... हल्लीचा अवस्थांतराचा काळ ब्राह्मणांच्या भावी उत्कर्षाचा निदर्शक आहे की अपकर्षाचा हे ठरविले पाहिजे... गेल्या वीस वर्षांच्या अवधीत ब्राह्मण विद्वानांची उंची दर दहा वर्षात दोन इंच या प्रमाणाने कमी झाली आहे. स्त्रियांमध्येही असाच व याहून अधिक ऱ्हास झाला आहे. शरीरसामर्थ्य तृतीयांशाने तरी कमी झाले आहे. समाजास कशी वृद्धावस्था आली आहे हे दाखविलेच आहे. करारी, निश्चयी, दीर्घोद्योगी, पौरुषगुणी माणसे नष्ट होत आहेत व नवी पैदा होत नाहीत, हे सांगितले म्हणजेच प्रत्ययाला येईल. लहानांपासून थोरांपर्यंत आत्मावलंबन नाही; विद्या आणि दारिद्र्य यांनी परस्परांस जोराने कचटाळिले आहे; व जेवढा हा देश विस्तीर्ण आहे, तेवढीच शिक्षितांच्या कर्तबगारीची मर्यादा आकुंचित झाली आहे. हे अवस्थांतर भावी ऊर्जित काळाचे निदर्शक आहे, असे म्हणावे तरी कसे?' (१९७-९८)

– ५ –

ब्राह्मण जात कड्याच्या टोकावर उभी राहून दरीत कोसळण्याच्या बेतात असताना तिला वाचविण्याचे व पुनः उत्कर्षाच्या मार्गावर नेऊन ठेवण्याचे प्रयत्न तातडीने व्हावयाला हवे होते. ब्राह्मणांच्या शारीरिक व बौद्धिक ऱ्हासाचे मूळ कारण म्हणजे शाळातून





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जारी असणारी दुष्ट शिक्षणपद्धती. ही शिक्षणाची भयंकर तऱ्हा सुधारण्यासाठी ब्राह्मण पालकांनी स्वतःच प्रयत्न केले पाहिजेत. 'प्राथमिक शिक्षण योग्य होत नाही, व त्यायोगे आपल्या मुलांचे नुकसान होते अशी ज्यांची खात्री होईल, त्यांनी एकवट होऊन आपल्या मुलांपुरता एक वर्ग काढावा, आपल्या मनाप्रमाणे शिक्षण द्यावे व जो येईल तो खर्च वाटून घ्यावा. हीच इतर शिक्षणाची गोष्ट होय. असा शेवटचा उपाय योजण्यास जेव्हा लोक तयार होतील, तेव्हा त्यांच्या खटपटीने हवी तितकी सुधारणा होऊ शकेल' (२१३). 'विद्याखात्याची व्यवस्था सर्वस्वी ब्राह्मणांकडे आहे असे म्हटल्यास चालेल; विद्याधिकारी ब्राह्मणांचे कैवारी आहेत; व हाताखालच्या ब्राह्मणांनी अमुक सुधारणा आवश्यक आहेत असे एकत्रित होऊन सांगितल्यास त्या सुधारणा करण्यास त्यांस परवानगीच नव्हे तर उत्तेजन व मदतही मिळेल. असे असता सर्वांनी उपाध्येगिरी आरंभिली आहे. म्हणजे 'नवरा मरो, नवरी मरो, दक्षिणेशी काम!' — या न्यायाने सर्वांनी आपले वर्तन ठेविले आहे. हानी स्वतःच्या ज्ञातीची व दोष सरकारच्या विद्याखात्यास!' (२१२)

नवीन शिक्षणक्रमात शरीराच्या संवर्धनावर व सुदृढतेवर पहिला भर असला पाहिजे. 'दुबळेपणा व विद्या यांची जोड आजपर्यंत कोणत्याही देशास हितावह झालेली नाही. तीमुळे सर्वत्र ऱ्हासाचा पाया पडला व परमपूज्यपदास चढलेली राष्ट्रे रसातळाला गेली' (३१४). बुद्धी, मनोवृत्ती व इच्छाशक्ती या तिन्हीचे योग्य शिक्षण होईल आता अभ्यासक्रम आखला पाहिजे. पण या तिन्हींचे शिक्षण होण्यास ज्ञानसाधनाची द्वारे जी इंद्रिये ती तीव्र केली पाहिजेत. त्यासाठी अवलोकन-शक्ती वाढविली पाहिजे. बुद्धीचे योग्य शिक्षण होण्यासाठी मुलाची बुद्धी जसजशी प्रौढ होत जाईल तसतशी अभ्यासाची कक्षा वाढविली पाहिजे. कोवळ्या वयात मुलांवर अभ्यासाचा बोजा टाकता कामा नये. मनोवृत्ती व इच्छाशक्ती यांच्या शिक्षणासाठी मुलांना चांगल्या सवयी लावल्या पाहिजेत. अशा सवयी शिक्षकांच्या अनुकरणाने लागतात.

त्यानंतर शाळेची रचना कशी असावी, अभ्यासक्रम कोणता असावा, किती व कोणते विषय केव्हा शिकविण्यात यावे, शाळेची फी काय असावी आणि शिक्षकास पगार किती द्यावा या जागरूक शिक्षकाला आवडणाऱ्या प्रश्नांची अतिशय तपशिलवार चर्चा गोळ्यांनी अगदी रंगून जाऊन केली आहे. त्या चर्चेत ते इतके रममाण होतात की, 'do' या क्रियापदाची रूपे विद्यार्थ्यांना कशी शिकवावी इथपर्यंत ते विवेचन करतात. गोळ्यांच्या या अघळ-पघळ व तपशिलात जाऊन निरूपण करण्याच्या पद्धतीचा टिळकांनी त्यांच्या टीकालेखात उपहासाने उल्लेख केला आहे.

त्यानंतर स्त्रीशिक्षणाच्या विवेचनाच्या निमित्ताने गोळ्यांनी स्त्रियांच्या घरातील स्थितीबद्दल बरीच निरीक्षणे मांडली आहेत. 'वपनाचे व विवाहाचे दोन प्रश्न सोडविले म्हणजे सुधारणेची परीक्षा पहिल्या वर्गात पास झाली असे कोणी समजू नये. गृहस्थिती सुधारणे हा स्त्रियांस सुखी करण्याचा पहिला मार्ग आहे, व उद्योगांवाचून व मनोवृत्तीच्या व धर्मबुद्धीच्या उत्तम शिक्षणावाचून हा मार्ग साध्य नाही.' (३०७-३०८) स्त्रियांसाठी गृहस्थिती सुधारायची असेल तर स्त्रीला स्वतःसाठी काही वेळ दिला पाहिजे आणि जिथे तिला स्वस्थपणा व विरंगुळा मिळेल, असे ठिकाण निर्माण केले पाहिजे. या दृष्टीने गोळ्यांनी 'प्रमदावना'ची कल्पना मांडली आहे. 'जोवर स्त्रीपुरुष व्यवहारात मिश्र होत नाहीत, जोवर करमणुकीच्या, ज्ञानप्राप्तीच्या व देवार्चनाच्या जागी स्त्रियांस पुरुषांशी मिश्र होण्याचा संकोच वाटत आहे, जोवर पुरुष-समाजातून चावटपणा व बीभत्स शब्दांचा उपयोग नाहीसा झाला नाही, तोवर स्त्रियांच्या करमणुकीच्या व देवार्चनाच्या जागा निराळ्या असल्या पाहिजेत; नाहीतर त्या घरकोंड्या होणारच. याकरिता प्रत्येक शहरी व प्रत्येक गावी स्त्रियांकरिता एक एक करमणुकीची जागा अथवा 'प्रमदावन' उत्पन्न झाले पाहिजे.' (३१०-३११)

ब्राह्मण जातीत त्या वेळी चालू असलेला वाद म्हणजे सुधारक व सनातनी यांच्यातील वाद. हा वाद फार विकोपाला गेला होता हे सर्वांस माहितच आहे. परंतु गोळे या वादाकडे अधिक पोक्त पद्धतीने व विवेकाने पाहतात. ब्राह्मण जात आल्या दिवसाला तोंड देण्यासाठी अनेक बदल स्वीकारत चालली आहे, हे ते पाहात होते. म्हणजे परिवर्तनाचा आग्रह धरणारे व परिवर्तनाला विरोध करणारे अशातला हा वाद नव्हता. गोळ्यांच्या मताने हा 'आशावंत' आणि 'अनुभविक' यांच्यातला वाद होता. 'जो नवीन फेरफार सुचविलेला असतो त्यापासून पुष्कळ हित होईल व त्याचा पुष्कळ लोक सदुपयोग करतील असे आशावंतास वाटत असते; उलट त्या फेरफाराने हितापेक्षा अहित अधिक होईल व पुष्कळ लोक त्याचा दुरुपयोग करतील, किंवा निदान त्यापासून कोणाचेही हित होणार नाही; किंवा त्याचा कोणास उपयोग होणार नाही अशी अनुभविक

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

माणसाची समजूत असते. हा भेद प्रत्येकांने दुसऱ्याचा थोडा तरी गुण घेतल्याखेरीज नाहीसा व्हावयाचा नाही.' (३२२) अखेरीस गोळे लिहितात, 'असुधारक ब्राह्मणास हालायास नको असे मानणे चुकीचे आहे; ते आपोआप जितके हालत आहेत तितके हालवूनही हालत नाहीत इतके मात्र खरे. आपण जन्मलो त्यावेळी जी ब्राह्मण जातीची स्थिति होती तीच मरते वेळी कायम राहील किंवा ठेवायची अशी कोणाही सुज्ञ माणसास आशा किंवा उमेद नाही. ब्राह्मण सुतारकाम करीत आहेत, लोहारकाम करीत आहेत, वाण्याची दुकाने घालून बसले आहेत, हॉटेलात मद्यमांसाच्या खरेदीचा हिशेब ठेवीत आहेत, तमाशात नाच्यापोऱ्याचेही काम करून जनरंजन करण्यास मागेपुढे पहात नाहीत. अशांची कुटुंबे वाळीत नाहीत... हा असा फेरफार अंधारात चाललेला नाही... या प्रकारे ब्राह्मण-समाजात अनुभविक माणसांच्या सल्यानेच होत असलेला फेरफार किती सांगावा? त्याचे श्रेय सुधारकांस नाही, तर अनुभविक जुन्या माणसांच्या दारिद्र्यास व सुज्ञतेस आहे व जर कोणताही फेरफार समाजास लवकर व्हावा असे सुधारकास वाटत असेल तर तो दारिद्र्य दूर करण्याचा व निश्चित हितसाधनाचा मार्ग आहे असे त्यांनी असुधारक सुज्ञ मंडळीच्या अनुभवास आणून द्यावे.' (३२५-३२६)

– ६ –

प्राचार्य म.शि. गोळे यांची लिहिण्याची पद्धत अतिशय अघळ-पघळ व विस्कळित आहे. विषयांतर करीत भरकटत जाण्याची त्यांची खोड आहे. लोकमान्य टिळकांनी गोळ्यांच्या भरकटण्या-विषयी उपहासाने लिहिले आहे, 'प्रि. गोळे यांच्या लेखणीची दृष्टी ग्रंथकर्तृत्वाच्या भरात बऱ्याच दुसऱ्या विषयांकडे वळली आहे. विद्यार्थ्यांच्या छातीची रुंदी, "डू" या क्रियापदाचे उपयोग कसे शिकवावे, प्रमदावन व त्यात देवालय असण्याची आवश्यकता, आकाशातील तारे, काँग्रेस व कॉन्फरन्स, सुधारक व गैरसुधारक" इत्यादी सर्व लहान-मोठ्या गोष्टींवर साधेल तेव्हा व वाटेल तशी टीका करण्यास प्रि. गोळे यांनी यत्किंचितही कसूर केलेली नाही?[२]

गोळ्यांचा मूळ मुद्दा जो शाळेतील अनर्थकारक शिक्षणपद्धती व तिचे विद्यार्थ्यांवर होणारे दुष्परिणाम तो टिळकांना पूर्ण मान्य आहे. 'हल्लीचा शिक्षणक्रम बेलगामी, बऱ्याच ठिकाणी निरुपयोगी, अव्यवस्थित आणि अविचाराचा आहे ही गोष्ट आम्हासही मान्य आहे... जर्मनी, इंग्लंड, अमेरिका वगैरे देशातून हल्ली ज्या नव्या नव्या शिक्षणपद्धती निघत आहेत त्यांचे काही अंशी तरी आँम्ही अनुकरण केल्याने आमचा शिक्षणक्रम सुगम होईल इतकेच नव्हे, तर त्यापासून लहान मुलांच्या मनावर जे अनिष्ट परिणाम घडतात तेही घडून येणार नाहीत, हे निर्विवाद आहे... प्रि. गोळे यांच्या पुस्तकात जर काही ग्राह्यांश असला तर तो येवढाच होय.'[३]

ब्राह्मणात पराक्रम, उद्योग, तरतरी, उपक्रमशीलता दिसत नाही, इत्यादी गोळ्यांची अवलोकने चुकीची आहेत असेही टिळकांचे म्हणणे नाही. पण ब्राह्मणवर्गाचा ऱ्हास होतो आहे किंवा त्याला जीर्णत्व आले आहे, हे टिळकांना मान्य नाही. त्यांचे म्हणणे की, इंग्रजी न शिकलेल्या जातीतून तरी कोठे कर्ते पुरुष निपजताना दिसत आहेत? 'हिंदुस्थानातील सर्व प्रांतातील व सर्व जातीतील लोकांस सारखीच निकृष्टावस्था प्राप्त झालेली आहे; व त्याचे प्रधान कारण म्हणजे परराज्य होय; कोणत्याही राष्ट्रातील लोकांच्या उत्साहबुद्धीवर परवशतेचा किती भयंकर परिणाम घडतो इकडे प्रि. गोळे यांनी जर नीट लक्ष पुरविले असते तर देशातील एकंदर लोकांच्या उत्साह-शून्यतेचे कारण त्यास तेव्हाच कळून आले असते. पण तसा विचार त्यांच्या ग्रंथात कोठेही केलेला नाही!'[४] परकीय राज्यात प्रजेच्या पराक्रमाला, उपक्रमशीलतेला किंवा कर्तबगारीला अजिबात वाव राहात नाही. 'एकोणिसाव्या शतकातील सुधारलेल्या ह्या परकीय प्रभूंची राज्यपद्धती अशी विलक्षण आहे की, त्यांनी हिंमतीची, शौर्याची, बुद्धीची, कल्पनेची कारागिरीची अथवा कर्तबगारीची सर्व कामे आपल्याच हातात ठेविली आहेत'[५] 'आम्ही सांगितलेले कारण हल्लीच्या स्थितीत तरी अपरिहार्य आहे हे आम्ही जाणून आहो. तथापि खरे कारण कळल्या खेरीज चांगल्या उपायांची योजना करता येत नाही, किंबहुना चांगले उपाय शोधण्यास खरी कारणे – मग ती परिहार्य असोत वा अपरिहार्य असतो – समजणे अवश्य आहे अशा समजुतीवर आम्ही येथे दाखल केली आहेत!'[६]

'आमची अशी समजूत आहे की, हिंदुस्थानास सध्या जी स्थिति प्राप्त झाली आहे, ती आपल्या हातून होईल तितकी सुधारण्याची खटपट करणे हेच ब्राह्मण ज्ञातीचे पहिले मुख्य कर्तव्यकर्म आहे!'[७] "ब्राह्मणवर्गास आणि विशेषेकरून दक्षिणेतील ब्राह्मणवर्गास जे पूर्वी महत्त्व होते ते राज्यकारभारात अग्रेसरत्व मिळाल्यामुळे होते; व तसे अगर त्याच्याहून थोडे कमी अग्रेसरत्व

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जेणेकरून पुनः मिळेल अशा उद्योगास आपण लागले पाहिजे. हे अग्रेसरत्व प्राप्त होण्यास समाजस्थितीत व गृहस्थितीत ज्या काही सुधारणा कराव्या लागतील त्या अनायासेच घडून येणार आहेत... ब्राह्मणवर्गाने राजकारणी खटपट सोडून स्वतः सुताराचे, लोहाराचे किंवा वैश्याचे धंदे केल्यापासून देशाचा अधिक फायदा होईल असे आम्हाला वाटत नाही... ब्राह्मणज्ञातीतील लोक जर सर्व धंद्यातील अग्रेसरत्व आपणाकडेच घेण्याचा प्रयत्न करतील तर त्यांचा व इतर ज्ञातींचा सहज विरोध उत्पन्न होईल. हा विरोध टाळून सर्व जातीस आपापली स्थिती सुधारण्यास लावणे हे आमचे कर्तव्य आहे; व आम्ही जो उद्योग करणार तो हे लक्षात ठेवूनच केला पाहिजे!'[८]

टिळकांचे म्हणणे असे की, सरकारी नोकरीतील वरच्या जागा मिळविण्यासाठी इंग्लंडमध्ये जाऊन परीक्षा द्याव्या लागतात. ही गोष्ट अवघड खरी; पण आपण तेथे जाऊन, गर्दी करून, परीक्षांना बसले पाहिजे व वरच्या जागा काबीज करण्याचा खुला राहिलेला मार्ग वापरला पाहिजे. त्याचप्रमाणे भाटे, गुजराती, मारवाडी लोकांनी व्यापारासाठी परदेशात जावे व तेथील व्यापार कब्जात आणण्याची खटपट करावी. विलायतेतील लष्करी कॉलेजात मराठे लोकांस घेत असतील, तर त्यांनी तिकडे जावे. सारांश, प्रगतीचा व उत्कर्षाचा जो जो मार्ग आपल्या देशातील ज्या ज्या जातीला अनुकूल असेल त्या त्या जातीने तो मार्ग चोखाळावा. सध्या ब्राह्मणांखेरीज इतर जाती असे काम होती घेण्याइतक्या पुढारलेल्या नाहीत. तेव्हा ब्राह्मणानीच हे काम पुढाकार घेऊन केले पाहिजे. 'म्हणजे ब्राह्मणांनीच उदमी व्हावे, असे आम्ही म्हणत नाही.... सर्व धंद्यांची सुधारणा होणे व त्या त्या धंद्यातील जोखमीची व कर्तबगारीची कामे आपल्या हातात घेणे याचा खरा अर्थ आमच्या देशाच्या मानाने पाहिला तर असा आहे की, हे धंदे ज्या जातीतील लोक करतात त्या सर्वांशी मिळून-मिसळून त्या सर्वांचा उत्कर्ष करण्याची इच्छा ब्राह्मणांनी मनात ठेविली पाहिजे. निष्काम पुढारीपणा पत्करण्याचे रहस्य यात आहे'.[९]

'परकीय राज्याखाली आम्ही बलहीन व सत्त्वहीन होत चाललो आहोत; आम्ही आहो तसेच राहिलो तर आणखीही होत जाऊ; ते इतके की कधी काळी इंग्रजी राज्य नाहीसे होण्याचा प्रसंग आला तर आम्ही आपले मेंढराप्रमाणे दुसऱ्याच्या ताब्यात जाण्यास तयार होऊ. ही स्थिती सुधारण्याचा काही मार्ग आहे काय?... या प्रश्नाचे उत्तर .... अशक्य आहे असे नाही... महाराष्ट्रातील तरुण मंडळीने... स्वदेशाकरिता एकनिष्ठपणाने आपले सर्व आयुष्य व बुद्धी खर्च करण्याचा... रामबाण निश्चय केला पाहिजे... त्यातूनही ब्राह्मणांवर आमचा विशेष कटाक्ष आहे. इंग्रजी विद्येने ब्राह्मणांच्या अंगी जो विनाकारण अहंपणा उत्पन्न झाला आहे, तो त्यांनी सोडला पाहिजे. सर्व प्रकारच्या, सर्व दर्जांच्या व सर्व जातींच्या लोकात मिसळून किंबहुना त्यांच्यात व त्यांच्याप्रमाणे राहूनही त्यांनी आपली स्थिती कशी सुधारावी हे आम्ही त्यास समजावून दिले पाहिजे... लोकात मिसळणे, त्यांना त्यांच्या हिताच्या गोष्टी समजावून सांगणे, परदेशात जाऊन म्हणा अगर स्वदेशात राहून म्हणा जेणे करून आपले कल्याण होईल त्या सर्व गोष्टी घडवून आणण्याचा प्रयत्न करणे, आशा न सोडता यावज्जीव एक सारखी दूरवर दृष्टी ठेवून उद्योग करणे व सर्वांस घेऊन पुढे जाणे हा खऱ्या देशहिताचा मार्ग आहे.'[१०]

**साधनग्रंथ**

१. ब्राह्मण आणि त्यांची विद्या
लेखक : महादेव शिवराम गोळे
महाराष्ट्र पब्लिशिंग हाऊस लिमिटेड, पुणे
आवृत्ती २ री. (१९३२)

२. लो. टिळकांचे केसरीतील लेख
भाग चौथा
केसरी-मराठी संस्था, पुणे. (१९३०)

**टीपा :**

१) पान १९८ (२)
२) पान २०६ (२)
३) तेथेच.
४) पान २१३ (२)
५) तेथेच.
६) पान २१९ (३)
७) पान २२१ (२)
८) पान २२२-२३ (२)
९) पान २२८ (२)
१०) पान २३२-२३३ (२)

अवतरण चिन्हातील मजकूर नव्या शुद्धलेखनाप्रमाणे लिहिला आहे. कंसातील आकडे साधन ग्रंथ १ मधील पानांचे आहेत.

**









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# लोहारांचा गाव – एक कुतुहल

गं.रा. पटवर्धन

इतिहासात नोंदलेल्या घटना ललित साहित्याच्या रचनेला स्फुरण देतात व ललित साहित्यातील उल्लेख इतिहासलेखनाला पोषक होतात, पण काही मर्यादेपर्यंत. इतिहासाविषयी काही अंदाज, काही अटकळी बांधता येतात, पण ठोस पुरावा सादर करता येत नाही. ज्योतिषशास्त्र, पुरातत्त्वशास्त्र, भाषाशास्त्र, मानववंश-शास्त्र यांप्रमाणे ललित साहित्याला दर्जा दिला नाही, तरी हायपोथेसिस – अंदाज – म्हणून त्यांचा उपयोग होऊ शकतो.

१९९२ मध्ये दुर्गाबाई भागवत यांनी पाली भाषेतील सुमारे ३० प्रेमकथांची ओळख करून दिली आहे. प्रस्तावनेत त्या लिहितात की, पाली वाङ्मयाचा फार मोठा भाग बौद्ध तत्त्वज्ञान, भिक्षूंसाठी आचारसंहिता यांनी व्यापला आहे. त्या वाङ्मयात धर्माशिवायचे मानवी जीवन चित्रित केलेले आढळणे कठीण. (पण आपल्या दृष्टीने तो भागच महत्त्वाचा.) या कथा मौखिक परंपरेने चालल्या असाव्यात व कालांतराने एकत्रित झालेल्या असाव्यात. या प्रेमकथांच्या निवेदन शैलीत त्यामुळे साधेपणा व सरळपणा आहे. कलात्मकतेची उणीव वास्तव जीवनदर्शनाने भरून काढली आहे. भावंडांमधील प्रेमाचा दोन कथांमध्ये निर्देश आहे, पण असे प्रेम बहुधा सहवासातून निर्माण झाले असावे, असे दुर्गाबाईंना वाटते.

या कथांच्या रचनेचा व त्यांतील पात्रांचा काळ इ.स. पूर्व ६०० ते ५०० यामध्ये समजावा; किंवा इ.स. पूर्व ५५० असा सरासरी धरता येईल. या कथांमध्ये राजघराण्यातील लोक, श्रेष्ठी, गणिका अशा पात्रांचा उल्लेख आहे. दोन कथांमध्ये गणिकेचा दर एका रात्रीला हजार सोन्याची नाणी असा दिला आहे. सहा कथांमध्ये श्रेष्ठींचा उल्लेख आहे, त्यात किरीटवत्स या श्रेष्ठीची दौलत ८० कोटी असे म्हटले आहे. इतक्या मोठ्या श्रेष्ठींचा व्यापार वा उद्योग काय होता याविषयी काही माहिती नाही. बौद्ध काळात भडोच व नाला सोपारा ही दोन बंदरे भरभराटीत होती. चीन ते इटली असा हिमालयातून खुष्कीच्या मार्गानेही रेशमाचा व्यापार चालत होता. एका कथेत गरूड जमात नाग बेटात राहात असल्याचा उल्लेख आहे. मानवाचे रूप घेऊन सोंगट्या खेळायला एक गरूड येत असे. त्याचा शोध घेणारा एक गायक भृगुकच्छ (भडोच) बंदरातून सुवर्णद्वीपाला एका व्यापारी जहाजातून गेल्याचा उल्लेख आहे. लंकेचा एका कथेत निर्देश आहे, तिचा राजा पण्डुवासुदेव आहे. इ.स. पूर्व ५४३ साली लंकेला राजा विजयने सिंहलद्वीप नाव ठेवले.

या कथांतून शहरांची किंवा राज्यांची नावे येतात त्यामध्ये कोसल, वत्स, कलिंग, मगध, अवंती, मिथिला, श्रावस्ती ही नावे परिचयाची आहेत. पण एका कथेत 'अरिष्टपुर' नाव येते, व दोन कथांमध्ये 'भद्र' नाव आहे. वाराणशी नाव ११ वेळा येते. आश्चर्य म्हणजे एका कथेत वाराणशी व काशी अशी दोन्ही नगरे उल्लेखिली आहेत. वाराणशीमध्ये ब्रह्मदत्त राज्य करीत होता, तर बोधिसत्त्व काशीमध्ये एका श्रीमंत ब्राह्मण कुटुंबात जन्मला. एकदा, मीठ व आम्ल सेवन करण्यासाठी तो हिमालय उतरून वाराणशीत पोचतो. तिथे राणीवर तो मोहीत होतो. पण राणी त्याला वाचवते. उपरती होऊन बोधिसत्त्व परत हिमालयात जातो. यावरून असे वाटते की, हल्लीच्या नेपाळमध्ये 'काशी' असावे. एका कथेत सांगितले आहे की, मिथिलेचे राज्य ३०० योजनांचे, तर वाराणशी फक्त सात योजनांचे आहे. अशी मापे इतर नगरांची दिलेली नाहीत. कुशावतीचा सम्राट औक्काक हा सर्व जंबुद्वीपात बलाढ्य होता. त्याला मूलबाळ नसल्याने राजा व राणी वेश्याव्रत देखील घेण्याचा विचार करतात, पण इंद्र प्रसन्न होऊन त्यांना यातून वाचवतो.

इतर सर्व कथांहून वेगळी असलेली कथा म्हणजे सुईविक्याची गोष्ट. नमूना म्हणून तिची सुरुवातच पहावी : "पूर्वी लोहाराच्या एका दरिद्री कुटुंबात एक कुशल मुलगा जन्माला आला. लोखंडाच्या सर्व तऱ्हेच्या वस्तू करण्यात तो फार निपुण होता. त्याच्या गावच्या जवळच एक हजार लोहारांची घरे असलेले एक गाव होते. हे सारे लोहार उत्तम कारागीर होते. त्या हजार लोहारात ज्येष्ठ आणि श्रेष्ठ कारागीर राजाचा फार आवडता होता. राजाची मर्जी असल्यामुळे तो श्रीमंत व उर्मट झाला होता. त्याच्यामुळे गावाला सुबत्ता आल्यामुळे सारे कारागीर त्याला वचकून असत. आजुबाजूच्या गावातून लोक









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

खुरपी, कुऱ्हाडी, नांगराचे फाळ, अंकुश वगैरे लोखंडाच्या वस्तू खरीदण्यासाठी त्या गावी यायचे."

समाजांच्या स्थित्यंतरांचे अश्मयुग, ताम्रयुग, लोहयुग असे नामकरण झाले आहे. वरील गोष्टीच्या काळात लोहयुग बरेच स्थिरावलेले दिसते. लोखंडाच्या वापरामुळे लढायांतील शस्त्रे, शेतीची व वाहतुकीची साधने, इत्यादी बनवणे आर्थिक व राजकीय दृष्ट्या सोयीचे झाले असणार. अशी हजार-हजार कारागीरांची गावे कुठे कुठे वसली गेली, त्यासाठी किती पिढ्या व शतके लागली असणार! युरोपात औद्योगिक क्रांती लवकर सुरू होण्याचे कारण तेथील लोखंड व कोळसा यांच्या खाणी होत. दुसऱ्या महायुद्धाच्या वेळी चर्चिल व हिटलर नॉर्वेतील लोखंडाच्या खाणींवर डोळा ठेवून होते. जंबुद्वीपातील अशा लोहार-गावाची इतर ठिकाणे, त्यांच्या उदय (व कदाचित अस्त) व भरभराट शोधून काढण्यापेक्षा, प्राचीन महायुद्धांच्या संदर्भात काही अंदाज बांधता येतो का ते पाहू. वेदांतील दाशराज्ञ युद्ध, राम-रावण युद्ध, व कौरव-पांडव युद्ध यांचा संदर्भ पाहिल्यास या युद्धांच्या कालगणनेसंबंधीही अटकळ करता येईल. *महाभारत : कल्पना व वास्तव* या नावच्या एस.पी. गुप्ता व के.एस. रामचंद्रन यांनी संपादित केलेल्या पुस्तकात अनेक मतांतरे सापडतात. श्री. के.सी. वर्मा म्हणतात (पृ. १२१) की, "साहित्यिक, खगोलज्योतिषीय व पुराणांतर्गत पुरावे पाहून वाटते की, महाभारत युद्ध इ.स. पूर्व १४३२ ते १४१४ या काळात घडले असावे". श्री.एस.बी. रॉय म्हणतात की, "कौरवपांडव युद्ध इ.स. पूर्व १४०० च्या सुमारास झाले असावे." श्री. एस.पी. गुप्ता असेही मत देतात की, हडाप्पा ताम्रयुगीन संस्कृती होती व तिचा काळ इ.स. पूर्व २५०० ते १७०० असा मानावा. तेव्हा पांडवांच्या काळात लोहयुग सुरू झाल्याला पुष्कळ वर्षे लोटली असणार, व इ.स. पूर्व ११०० च्या अलीकडे कौरवपांडव युद्धाचा काळ ओढू नये. या वेळी आग्र्याच्या दक्षिणेस ग्वाल्हेरपर्यंत तेथील प्रस्तरात खूंप लोखंड होते. अतरंजीखेड (उत्तर प्रदेश) येथे उत्खननात इ.स. पूर्व ११०० इतके प्राचीन लोह मिळालेले आहे. अथर्ववेदात कृष्ण-अयस् असा लोखंडाचा उल्लेख आहे. ऋग्वेदातील नुसत्या अयस् शब्दाचा अर्थ लोह नाही असे प्रा. म.अ. मेहेंदळे यांनी म्हटले आहे. ऋग्वेदात आढळणारा 'असि' शब्द पशू कापण्याच्या सुरीसाठी वापरत होते. असित–असि–काळा अशी संगती लावता येईल. 'असि' शब्द ऋग्वेदाच्या पहिल्या व दहाव्या मंडलात येतो, व अथर्ववेदात येतो तेव्हा त्याचा अर्थ तलवार असा लावता येईल.

इ.स. पूर्व २२०० पासून ते इ.स. ३०० या अडीच हजार वर्षांत जंबुद्वीपाची लोकसंख्या १० लाखांपासून वाढत २०० लाख झाली असेल असा अंदाज केल्यास त्यातील नगरांची व मोठ्या गावांची संख्या यांचाही अंदाज येऊ शकतो. दाशराज्ञ युद्धात ज्या टोळ्या कुरूंच्या नेतृत्वाखाली स्वारी करत होत्या, त्यातील विश्वामित्र ऋषी व वशिष्ठ ऋषी एकत्र झाल्यामुळे व पांचालांकडे गेल्यामुळे कुरूंचा जय झाला नाही. व पांचालांची भिस्त परुष्णी नदीवरचे बंधारे फोडण्यावर होती. या वेळी लोखंडाचा वापर झाला असल्याची शक्यता दिसत नाही.

राम-रावण युद्ध समसमान पक्षांचे नव्हते; एका बाजूला होते वानर व ऋक्ष व दुसऱ्या बाजूला राक्षस! राम, लक्ष्मण वनवासाच्या हालअपेष्टा पायी चालून भोगीत होतो; राक्षस रथांतून येत. दोघांकडे धनुष्ये होती, पण राम बाणांचा वापर अत्यंत काटकसरीने करत होता. वानर आणि ऋक्ष हात, नखे, दात, त्याचप्रमाणे दगड व उपटलेली झाडे घेऊन लढत. युद्ध करताना मूर्च्छा आली तर त्यावर प्रहार करत नसत. इंद्रजिताने खोट्या सीतेचा वध करून राम-लक्ष्मणांना नाउमेद केले, पण या मायावी युद्धातसुद्धा लोखंडाचा वापर होता असे दिसत नाही. राम लक्ष्मणाला ब्रह्मास्त्र वापरण्यापासून परावृत्त करतो. रावणाची अनेक शिरे कापूनही रामाला त्याचा वध करता आला नाही, तेव्हा मातलीने त्याला सल्ला दिला. इंद्रजिताच्या यज्ञात विघ्न आणून वध करण्याचा सल्ला विभीषणाने लक्ष्मणाला दिला. तेव्हा लोहाचा उपयोग झाला असल्यास फार माफक प्रमाणात झाला असणार. राम-रावण युद्धाचा अंदाजे काळ इ.स. पूर्व २२०० समजता येईल.

तेव्हा या धावत्या आढाव्यातून असे दिसले की, हजार लोहारांचा गाव ही एक क्षुल्लक बाब नव्हती. प्रणयरम्य ललित साहित्याकडे खोल पाहण्याची आवश्यकता आहे. बौद्ध काळात या गावाचे अस्तित्व मान्य केले तर नंतरच्या काळात त्या गावाचे काय झाले हा संशोधनाचा विषय होऊ शकतो. लोहारांची स्वतंत्र गावे इतरत्र सापडतात का हे पहावे लागेल.

**

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्रेमाचे प्रक्षेपण हाच तरणोपाय!

**बाबूराव चंदावरकर**

बदलत जाण्याऱ्या संदर्भानुसार शब्दांचे अर्थही बदलत असावेत, असे वाटते. प्रेम या शब्दाविषयीही असे झाले असणे संभवतेच.

**- १ -**

माझ्या अमेरिकेतल्या वास्तवात मला एकदा शेतमजूर (फार्म-वर्कर) चळवळीच्या एका संघटनेच्या कार्यकर्त्यांसमोर व्याख्यान देण्यासाठी आमंत्रित केले गेले होते. मिशिगन राज्याची राजधानी लॉन्सिंगहून संघटनेच्या सचिव (मिनिस्टर) युवतीने आपल्या कारमधून मला डेट्राईट शहरात नेले व परत लॉन्सिंगला आणून सोडले. डेट्राइटहून लॉन्सिंगला परत येताना प्रेम या जाणीवेविषयी सचिव युवतीने अनेक प्रशन मला विचारले होते. यावर लॉन्सिंगला पोहोचेपर्यंत दोन तास तरी मी तिच्याशी बोलत होतो. प्रेम हा शब्द जगात व विशेषकरून युरोप-अमेरिकेत अविवेकी लैंगिक संसगतीमुळे प्रदूषित झाला आहे. कदाचित तो प्रदूषित करण्यात आला असावा, असेही म्हणता येऊ शकते. कारण अनियंत्रित औद्योगिकीकरणाच्या झपाटलेपणातून ज्या उपभोगवादाचा विस्तार झालेला दिसतो आहे, त्यात प्रेम ही संकल्पना प्रदूषित होणे कदाचित स्वाभविकच म्हणायला हवे. यावर मी केलेले विवेचन ऐकून सचिव युवती काहीशी उत्साहित झाली असावी. म्हणून तिच्या मनात उठत असलेल्या प्रश्नांचे समाधान मी करून द्यावे, या हेतूने ती सतत मला तिच्या मनात येईल ते उत्कटपणे विचारत होती. मीही संकोच न बाळगता उत्तर देत होतो. अशा स्थितीतच 'स्त्री-मुक्ती' वरही बोलावेच लागले होते. "अमेरिकेत स्त्री-मुक्ती कशाला म्हणतात?" असे मी तिला थेट विचारले. तेव्हा, ती "फ्री सेक्स" (मुक्त लैंगिकता) यावर येऊन पोहोचली होती. पुरुष या दृष्टीने मुक्त किंवा स्वतंत्र आहेत, म्हणून स्त्रियांनाही मुक्त किंवा स्वतंत्र राहता यायला हवे, असा एक अमेरिकेतल्या स्त्रियांना वाटणारा सर्वसाधारण मतप्रवाह अमेरिकेत रूढ झाला आहे. वॉशिंग्टनच्या एका (बुद्धिजीवी) विदूषीबरोबर जागतिक बँकेच्या एका दालनात यावर माझा संवाद झाला होता. त्यात हा मतप्रवाह मला प्रकर्षाने जाणवलाही होता. तेव्हा, प्रेमाची मुक्त आनंद देणारी अभिव्यक्ती म्हणून या मुक्त लैंगिकतेचा (फ्री सेक्स) पुरस्कार अमेरिकेत केला जातो, अन्य युरोपीय राष्ट्रातही कदाचित हेच असेल. पण, मुक्त लैंगिकतेला जर आनंद देणारी प्रेमाची अभिव्यक्ती मानली तर भोगवासनेचा दोष वा विकृती त्यात असते किंवा काय, याचाही उलगडा करून घेणे गरजेचेच असते. पण माझ्या अनुभवानुसार तरी वाटते की, अमेरिकेत हा उलगडा सहसा करून घेतला जात नसावा. कारण, 'सेक्स'चे अस्तित्वच भोगवासनेच्या मर्यादेत असते, राहू शकते व राहतेही. तेव्हा याचा मागोवा घेत आपली वैचारिक क्षमता वाढवीत जाण्याला अमेरिकेच्या एकूण वातावरणातच संधी नसावी, असे मला जाणवले आहे. याची वाच्यता जेव्हा मी सचिव युवतीजवळ केली, तेव्हा अमेरिकेतल्या एकूण वातावरणाचे मी दोषदर्शन करीत आहे, असेच कदाचित तिला वाटेल असे क्षणभर मला जाणवून गेले होते. पण, या सचिव युवतीने तिच्या बोलण्यातून याची कोणतीच भावाभिव्यक्ती केलीच नव्हती. म्हणून काहीसा निर्भय होऊनच मी तिच्याशी बोलत होतो. असे चालले असतानाच तिने मला प्रेमाच्या सात्त्विक भावाविषयी विचारले. तिची जिज्ञासा तिच्या व माझ्याही जाणीव विकासाच्या दृष्टीने उपयोगी व महत्त्वाची वाटल्यामुळे मी प्रेमाच्या सात्त्विक अभिव्यक्ती विषयी बोलू लागलो. सात्त्विक भाव सत्याचा पुरस्कार केल्यावाचून येत नाहीत. म्हणून सत्यनिष्ठेतूनच सात्त्विकभाव माणसात येतात हे मान्यच करायला हवे!

**- २ -**

महात्मा गांधींच्या 'प्रेम' संकल्पनेचा आधार घेऊन प्रेमाच्या अभिव्यक्तीचे स्वरूप उलगडून सांगण्याचा प्रयत्न मी केला व तो सचिव युवतीला भावला देखील. महात्मा गांधी रस्त्याने चालत जाताना त्यांना रस्त्यावर दोन मुलगे बसलेले दिसले. त्यातला एक स्वच्छ-सुंदर होता व दुसरा अस्वच्छ-कुरूप होता. महात्मा गांधींनी अस्वच्छ व कुरूप दिसणाऱ्या मुलाला उचलले व त्याचे चुंबन घेतले. अन्य कोणी असता तर स्वच्छ-सुंदर




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिसणाऱ्या मुलाला उचलून त्याचे चुंबन घेतले असते, जे सर्वसामान्यपणे सर्वत्रच दिसत असते. पण महात्मा गांधींना अस्वच्छ मुलाची अस्वच्छता घालवायची होती व त्याची कुरूपता नाहीशी करण्याच्या हेतूने हे त्यांना करावेसेही वाटले होते. त्यांनी त्या मुलाला आंघोळ घालून स्वच्छ केले. यातून त्यांच्यात सेवावृत्तीचा प्रादुर्भाव होतो. तेव्हा, अशा तऱ्हेने महात्मा गांधी प्रेमाला सेवेतून अभिव्यक्ती देतात. प्रेमातून सेवावृत्तीचा उद्‌भव झाला तर ते खरे माणसांनी माणसांवर केलेले प्रेम म्हणायला हवे. तेव्हा प्रेमातला सात्त्विक भाव हा सेवेच्या कृतीतून निपजतो म्हणून तो निर्मळ असतो. या उलट स्वच्छ मुलाला उचलून महात्मा गांधींनी त्या मुलाचे चुंबन घेतले असते तर त्यातून सेवेच्या ऐवजी मोहाचेच प्रदर्शन झाले असते. तेव्हा प्रेमाला सेवेतूनच अभिव्यक्ती देता येऊ शकते किंवा ती मिळतही असते, यातून प्रेमाला मोहाच्या बंधनातून व दुष्परिणामातूनही मुक्त ठेवता येऊ शकते. अर्थात मोह म्हणजे प्रेम नव्हे. 'फ्री सेक्स' मध्ये प्रेमाची अभिव्यक्ती नाही, मोहाची अभिव्यक्ती आहे. म्हणून, 'फ्री सेक्स' मध्ये प्रेम नसते फक्त भोग असतो. प्रेम हे आनंदाची अशी एक अभिव्यक्ती आहे जी संपता संपत नाही. म्हणून ती अमर्याद आहे. 'फ्री सेक्स' मात्र क्षणजीवी व मर्यादित असल्यामुळे संपणारा व नष्ट होणारा असतो व आहे. कारण, तो मुक्त मोहाचीच अभिव्यक्ती असतो व आहे.

संपतासंपत नाही ती प्रेमाची अभिव्यक्ती सेवेच्या माध्यमातूनच सुगंध पसरवीत असते म्हणून ती प्रेमाचे प्रक्षेपण करणारीच होतही असते. महात्मा गांधींच्या प्रेमाचे प्रक्षेपण जगभर झाले. म्हणून ते डॉ. मार्टिन ल्यूथर किंगच्या (ज्युनियर), वियतनामचे अध्यक्ष हो ची मिन्हच्या व शेतमजूर कामगार संघटनेचे अमेरिकेतले प्रवर्तक सीजर साचेज यांच्या हृदयाला जाऊन भिडले होते. प्रेमाची सात्त्विक अभिव्यक्ती अशीच असते जिच्यातून 'सत्याग्रहा'चा जन्म होऊ शकतो व होतोही!

प्रेमाच्या सात्त्विक भावाचे माझे विवेचन त्या सचिव युवतीला भावले असणार. म्हणूनच तिने प्रसन्न चित्ताने माझे आभार मानले होते!

– ३ –

जीन शिकलन ही कॅथॉलिक नन (आता विवाहिता) माझ्या बरोबरच लॅन्सिंगपर्यंत प्रवासात होती. हिनेच माझ्या व्याख्यानाचा योग घडवून आणला होता. जीन मला मिशिगन राज्यात अनेक ठिकाणी घेऊन गेली. भूमिहीन शेतमजूर हा माझ्या आस्थेचा व अध्ययनाचा विषय आहे, हे तिला माहित झाल्यामुळे ती मला शेतमजूरांच्या संघटना चालवण्याऱ्या महत्त्वाच्या पुढाऱ्यांना भेटवू शकली. यामुळे या नेत्यांशी मला संवाद करता आला. तसेच शेतकरी मजूरांच्या अमेरिकी खेड्यातल्या घरांमधूनही तिने मला त्यांच्याशी संवाद करण्यासाठी नेलेच होते! अमेररिकेत कोणीही कोणालाही भेटताना प्रथम आलिंगन देतो-घेतो व चुंबनही देतो-घेतो. यात स्त्री-पुरुष भेद पाळला जात नाही. मला भेटताना एकदाही जीनने आलिंगण देण्याचा व तो घेण्याचा प्रयत्न केला नव्हता. ती माझ्या जवळ येऊन बराच वेळ माझ्याकडे बघतच उभी राहायची. मी हात पुढे केला की माझा हात ती स्वतःच्या हातात घेऊन शेकहँड करायची. ती मला एकदा म्हणाली की, "तुमच्या पुढे आल्यावर मला भारताच्या सांस्कृतिक जीवनशैलीची लगेच आठवण होते. यात आलिंगण व त्या सोबत चुंबन देण्याघेण्याचा अमेरिकेतला प्रकार स्वीकृत केला गेलेला नाही हे लक्षात येते. याचा सरळ संबंध भारतीय संस्कृतीशी असावा असे मला वाटते." कदाचित हे तिचे म्हणणे खरेच असेल. कारण, भारतीय संस्कृतीत जीवनशैली अनेक अंगांनी पारखून घेतलेली आहे. याचे अनेक प्रयोगही झालेले आहेत. एकदा न्यूयॉर्कहून मी वॉशिंग्टनला जाण्यासाठी विमानाने प्रवास करीत होतो. जेवणाची वेळ होताच एअर होस्टेस (हवाई सुंदरी) माझ्या जवळ आली व मला सलाम (सॅल्यूट) करून म्हणाली की, "कोणता खाद्य पदार्थ आणू? कारण, तुम्ही संपूर्ण शाकाहारी आहात. अंडे देखील तुम्हाला चालत नाही." हे सर्व माझ्या तिकिटावर लिहिलेले होते. मी तिला म्हणालो, "मला फक्त ब्राऊन ब्रेड व ऑरेंज ज्यूस दे. बाकी काही नको." तिने मला पुन्हा सलामी दिली व म्हणाली की, "तुम्ही महात्मा गांधींच्या देशातले आहात. भारत महान देश आहे. गांधीसारखा महात्मा ज्या देशात जन्माला आला. त्याला माझे सलाम!" भारताच्या जीवनशैलीत सांस्कृतिक मूल्ये जतन करण्याचे अनेक यशस्वी प्रयोग झालेले आहेत. यातलाच प्रमुख प्रयोग शाकाहार आहे. याचे मूल्य जगभर अनेकांना आकर्षितही करते! हे आकर्षण अमेरिकेतल्या शेतमजूर संघटनेचे संस्थापक प्रमुख सीजर सावेझनाही होते. अमेरिकेत वास्तव्य करून असलेल्या चार अनिवासी भारतीय मित्रांबरोबर मी सीजर सावेझना भेटायला कॅलिफोर्नियात त्यांच्या निवासस्थानी गेलो होतो व त्यांच्याशी


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रदीर्घ चर्चा केली होती. संध्याकाळी जेवणाच्या वेळी त्यांच्या निवासातच टेबलावर जेवणाची पाने घेतली गेली. माझे आणि सीजर सावेझची दोन पाने एका वेगळ्या टेबलावर लावलेली होती. सोबतच्या भारतीय मित्रांची पाने वेगळ्या टेबलावर लावलेली होती. ते सर्वच मांसाहारी होते. सीजर सावेझ ज्या टेबलाकडे मला घेऊन गेले ते पाहून मी थोडा आश्र्चर्यचकित झालो. माझा शाकाहार त्यांना आधीच विदीत करण्यात आला होता. ते माझ्याबरोबर शाकाहारी पानावर बसले व जेवण करू लागले. मी त्यांना सहज विचारले की, "तुम्ही शाकाहारी आहात काय?" ते उत्तरले, "होय, मी शाकाहारी आहे. याची प्रेरणा मला महात्मा गांधींकडून मिळाली." महात्मा गांधींच्या प्रेमप्रसारणाचे हे एक साक्षात दर्शनच त्यावेळी मला झाले होते. (सिजर सावेझ यांचे निधन झाले आहे.)

– ४ –

महात्मा गांधींच्या अहिंसेविषयी जगभर चर्चा होतच असते. पण, ही साधारणपणे सतत घडत जाणाऱ्या हिंसेच्या प्रतिक्रियेतलीच असते. कारण हिंसा सहअस्तित्वाला घातक असते व आहे, एवढेच यातून लक्षात घेतले जाते. पण, मानवी सहअस्तित्व ज्यातून घडून येत असते वा घडवता येणे शक्य होत असते, त्याच्या मूलतत्त्वाला लक्षात घेणे मात्र गरजेचे असते व आहे. हे मूलतत्त्व म्हणजेच 'प्रेम' आहे. हिंसा अमान्य करणारे अहिंसक म्हणवले जातात. पण, हिंसेच्या प्रतिक्रियेतलीच अहिंसा आहे, असेच यातून सिद्धही होत असते. प्रेमाचे मात्र असे नाही. कारण, प्रेम सकारात्मकच असू शकते व आहे. ते कधीच नकारात्मक नसते व नाही. तेव्हा अहिंसेचा विचार करताना ते 'सत्याकडे नेणारे एक साधन आहे' हे जे महात्मा गांधींनी म्हटले होते ते फक्त हिंसेला नाकारण्यासाठीच होते. पण असे काहीही नाकारण्यासाठी प्रेम करावे लागत नाही व ते तसे करताही येत नाही. अर्थात, प्रेम प्रत्यक्षात करावेच लागते कारण ते मानवी स्वभावाला धरून असते व आहे. म्हणूनच ते सकारात्म (पॉझेटिव) आहे व असेतेही! यात अहिंसेची नकारात्मकता (निगेटिव) व प्रेमाची सकारत्मकता या दोहोतले अंतर दोन वेगवेगळ्या संदर्भातले आहे. हिंसेच्या उद्‌भव झाला की, तो एक अहिंसेचा संदर्भ होत असतो. हिंसेच्या उद्‌भवाशी मात्र प्रेमचा संबंध नसतो व नाही. म्हणून, मानवी सहअस्तित्व साधणे हाच कायम स्वरूपाचा एकमेव स्वाभाविक संदर्भ प्रेमाचा आहे. म्हणून, हिंसेच्या प्रतिक्रियेत प्रेमाचे अस्तित्व नसते व नाही, जसे हिंसेच्या प्रतिक्रियेत अहिंसा असते. तेव्हा, प्रेमाचे मूल्य अहिंसेपेक्षा वेगळे, स्वतंत्र व स्वायत्त आहे. अहिंसेचे मूल्य हिंसेच्या अभावातून निर्माण होत असते म्हणून ते स्वतंत्र व स्वायत्त मूल्य ठरतही नाही.

अर्थात, सेवेतूनच प्रेमाचे प्रक्षेपण होत असते व होत राहावे लागते. यातच माणसाचा धर्म (कर्तव्य) सेवाधर्म (सेवाकर्तव्य) होतो व होत असतो. म्हणून, सेवावृत्ती बाणवणे ज्यांना शक्य होत असते त्यांनाच प्रेमाचे प्रक्षेपण करता येणे शक्यही होत असते!

– ५ –

सध्याच्या जगातला प्रचलित संदर्भ या दृष्टीने लक्षात घ्यायला हवा. जगात सर्वत्र दहशतवादाची भीती निर्माण झालेली आहे. कोणतेही बलाढ्य शासनकर्ते याला रोखून धरू शकत नाहीत. हीच एक शासनकर्त्यांची केविलवाणी अथवा दयनीय स्थिती झालीही आहे. राज्यवादाच्या पुरस्कारातली प्रखर प्रतिक्रियाच दहशतवाद आहे. ही प्रखरता राज्य करण्याच्या अनावर इच्छा-आकांक्षेतली असल्यामुळे यातूनच राज्यवाद विकृत अवस्थेप्रत जाऊन पोहोचतो ही एक वस्तुस्थिती आहे. सामान्यतः याचे भानच ठेवले जात नाही. म्हणून, राज्य करण्याच्या अनावर इच्छेतून जी एक स्वाभाविकपणेच शोषण प्रक्रिया अस्तित्वात येत असते, त्याच्या प्रतिक्रियेतूनच दहशतवाद अस्तित्वात येतो. हे लक्षात घेण्यासाठी जी एक मानसिकता राज्यकर्त्यांची व्हावयाला हवी असते तीच मुळात होत नसल्यामुळे राज्यवादात अतिरेक येत जातो. यातूनच राज्याचा दहशतवाद (स्टेट टेरेरिझम) येतही असतो. याचे आकलन राज्यवादी करून घेत नाहीत अर्थात, राज्य करण्याच्या इच्छा-आकांक्षेत शोषण-प्रक्रियेला स्थान दिल्याशिवाय ती फलद्रुप होतच नाही. तेव्हा, राज्य करण्याची इच्छा-आकांक्षा मनुष्यस्वभावाच्या विपरीत असते, हे कळायला हवे. कारण, ती राज्यवादाच्या संस्कारातली असते. हा संस्कार प्रेमाच्या अभावातून येतो. म्हणूनच राज्यकर्त्यांना माणसांवर प्रेम करता येत नाही, फक्त ते राज्यच करू शकतात. राज्य करणे हा मानवी गुण नव्हे सद्‌गुण तर नव्हेच नव्हे! प्रदूषित मनाच्या तीव्रतेतून आलेला तो एक मनोविकारच आहे. म्हणून, राज्य करण्याची प्रवृत्ती हा एक मनोविकारच आहे हे लक्षात घ्यायला हवे. हे जेव्हा लक्षातच

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेतले जात नाही, तेव्हाच राज्याच्या दहशतवादातून (स्टेट टेरेरिझम्) प्रतिक्रिया होऊनच बंडखोरीतला दहशतवाद अस्तित्वात येतो, म्हणून प्रेमाच्या आविष्काराचे लोकजीवनातले सर्व स्रोत नाहीसे करूनच राज्यवादाचे पुरस्कर्ते राज्यकर्ते बनत असतात व यातूनच शोषणकारी शासन अस्तित्वात येत असते. म्हणून, कोणत्याही काळी शासन लोकांचे शोषण करणारेच राहिलेलेही आहे. प्रेमाचे उपासक व संवर्धक याला शोषणरहित, शासननिरपेक्ष समाजरचनेचा पर्याय शोधत असतात, हा पर्यायच अहिंसक समाजरचनेचा मानलाही जातो. या ठिकाणी प्रेमाची अभिव्यक्ती अहिंसेतूनच करण्याचा प्रयत्न असतो व आहे. कारण हिंसेला तत्काल रोखून धरणे अहिंसेच्या वृत्तीमुळेच शक्य होत असते. अहिंसेची निरंतर प्रक्रियाच शोषण विरहित व शासननिरपेक्ष समाज घडवू शकते, ही याची मानवीय निष्ठा आहे. राज्य करण्याच्या वृत्तीतली शोषणप्रक्रिया जेव्हा अस्तित्वात येते, तेव्हा तिला रोखून धरण्याची मानवीयता अहिंसावृत्ती धारण करूनच बाणवली जाऊ शकते. म्हणूनच अहिंसावृत्तीतून प्रेमाचे प्रक्षेपण करता येऊ शकते अशी याची जर मानवीय धारणा बनू शकली, तरच राज्याची शोषणकारिता जी राज्याच्या दहशतवादात परिवर्तित होत असते व याच्या प्रतिक्रियेतूनच लोकजीवनात शासनविरोधी बंडखोरीतला दहशतवाद उद्भवतही असतो, त्यावर अंकुश लावता येऊ शकेल!

शेवटी क्राय तर राज्याचा दहशतवादच बंडखोरीच्या दहशतवादाला जन्म देतो, हे कळायला हवे व लक्षातही घ्यायला हवे! अर्थात, प्रेमाचे प्रक्षेपण होत राहिले तरच हे शक्य होणारे आहे. मानवजातीला दुःखाचा सागर तरून जाण्याचा हा एकमेव मार्ग आहे, असेच म्हणायला हवे!

**

---

## लेखक परिचय

- **प्रा. शांताराम कुलकर्णी** : प्राध्यापक, शिक्षणमहाविद्यालयात; उद्योग क्षेत्रात प्रशासन अधिकारी. ६० विनोदी कथा प्रसिद्ध, इस्राईलवरील पुस्तक प्रसिद्ध, गंभीर लेखनाकडे कल. वनवासी कल्याण आश्रमाशी सलग्न अशा *'सुयश आदिवासी ट्रस्ट'* संस्थेमध्ये मानव सचिव. पत्ता : ३ कुमार अपार्टमेंट्स, 'रघुनंदन'च्या मागे, हिंगणे खुर्द, पुणे ४११ ०५१.
- **श्री.मा. भावे** : प्राध्यापक, आय.आय.टी. पवई, मुंबई; गणित व तत्त्वज्ञान या विषयाचे ज्येष्ठ अभ्यासक. या विषयांशी संबंधीत २५ शोधनिबंध प्रसिद्ध. शिक्षक चळवळीत सहभाग. पत्ता : ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे ४११ ००४.
- **चंद्रकांत अभंग** : कोपरगाव, जिल्हा नगर, येथील के.जे. सोमय्या महाविद्यालयात प्राध्यापक; इतिहास विषयात डॉक्टोरेट, मराठी कागपत्रांचे अभ्यासक. पत्ता : के.जे. सोमय्या कॉलेज, कोपरगाव, जिल्हा नगर, पुणे.
- **राम बापट** : निवृत्त प्राध्यापक व विभाग प्रमुख, राज्यशास्त्र विभाग, पुणे विद्यापिठ, विचार-वेध-संमेलनाचे माजी अध्यक्ष. पत्ता : १५७/८, औंध, पुणे ४११ ००७.
- **गं.रा. पटवर्धन** : आयकर विभागातील निवृत्त अधिकारी. पत्ता : ८००, भांडारकर रोड, पुणे ४११ ००४.
- **बाबूराव चंदावरकर** : समाजसेवक आणि सामाजिक प्रश्नांचे अभ्यासक. पत्ता : सई नगर क्र. २, डी-२, फ्लॅट क्र. १३, सिंहगड रोड, पुणे ४११ ०३०.
- **दामोदर कोसंबी** : फर्ग्युसन महाविद्यालय व टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडामेंटल रिसर्च येथे गणिताचे प्राध्यापक; मार्क्सवादी विचारवंत. भारताच्या प्राचीन इतिहासाचे अभ्यासक, नाणेशास्त्रातील तज्ज्ञ, मृत्यू - १९६६.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# बौद्धधर्माचा हिंदुस्थानात ऱ्हास का झाला?

**दामोदर धर्मानंद कोसंबी**

अनुवादक : श्री.मा. भावे

चिनी प्रवासी युएनच्यांग (इ.स. ६३०) हिंदुस्थानात आला असता त्याला एका दलदलीच्या ठिकाणी चिखलात रुतलेल्या मूर्ती आढळल्या. तेथील लोकांनी त्याला सांगितले की, या मूर्ती जेव्हा पूर्ण बुडतील तेव्हा तथागतांनी उपदेशिलेला धर्म इथून नाहीसा होईल, अशी आमच्यात समजूत आहे. त्या काळी बंगालमध्ये शशांक राजा राज्य करीत होता. त्याने बौद्धांची अनेक धर्मस्थळे फोडून टाकली होती आणि गयेतील ज्या वृक्षाखाली बुद्धाला ज्ञान प्राप्त झाले, तो वृक्ष त्याने जाळून टाकला होता.

परंतु, त्या जाळून टाकलेल्या वृक्षाची एक डहाळी सम्राट अशोकाचा अखेरचा वंशज जो पूर्णवर्मन त्याला सापडली आणि तिचे जतन करून त्याने तो वृक्ष पुनः वाढविला. इकडे हर्षाने शशांकाचा पराभव केला. बौद्धांची धर्मस्थळे फिरून बसविली व आणखी धर्मस्थळे बांधली. (युएनच्यांगच्या काळात) हजारो बौद्ध मठ होते. तेथील भिक्षूंच्या जथ्यांना अन्नपाणी मिळत होते. नालंदाचे विद्यापीठ वैभवाच्या शिखरावर होते आणि त्याला उत्पन्नाचे नवीन स्रोत लाभत होते. बौद्धांच्या दृष्टीने सारे आबादी-आबाद होते.

पण या धर्माला आजार जडला होता व त्याचा पुरावा या प्रवाशाच्या लिखाणातून मिळतो. आपल्या लिहिण्यातून अशी सूचना मिळते हे कदाचित त्याच्या ध्यानात आले नसेल. "ज्या भिक्षूला तीन ग्रंथांचे ज्ञान झाले असेल, त्याला अनेक सेवक दिमतीला मिळत... ज्याने पाच ग्रंथांचे अध्ययन केले असेल, त्याला अंबारीचा मान मिळे. षड्ग्रंथी पंडिताला लवाजमा देण्यात येई.... जो अस्खलित भाषा, सूक्ष्म अध्ययन, सखोल चिंतन व धारदार मुक्तिवाद यांच्या सहाय्याने वादात प्रतिपक्षाचा पाडाव करी त्याची सोन्याची झूल घातलेल्या हत्तीवर बसवून, मठाच्या दारापर्यंत मिरवणूक काढीत. उलट एखादा विद्वान वादात अडखळला, किंवा त्याने हीन भाषा वापरली, अगर त्याचा युक्तिवाद चुकला तर ते त्याच्या चेहऱ्यावर तांबडे-पांढरे रोगण चोपडीत, त्याच्या शरीरावर शेण थापीत आणि त्याला एखाद्या खड्डयात किंवा रानात सोडून देत. अशा रीतीने संभावना करून ते गुणात्म व फालतू किंवा हुशार व मूर्ख यांच्यातील भेद दाखवून देत."

बुद्धाच्या काळी मनुष्याची परीक्षा व त्याची संभावना या रीतीने नक्कीच क़रीत नसावेत. भिक्षूंनी सतत हिंडत राहावे, लोकांना त्यांच्या भाषेत व सोप्या शब्दात शुद्ध चारित्र्याची शिकवण द्यावी, असा बुद्धाचा आदेश होता. या उलट, ज्या भोवतालच्या खेड्यातून मिळणाऱ्या रसदीवर श्रीमंत मठातून राहणाऱ्या विद्वानांची चैन चाले, तेथील खेडुतांविषयी या वादविवादपटू पंडितांना कोणतीच कोणतीही सहानुभूती नव्हती. भिक्षूंनी अगदी किमान गरजा भागतील इतकीच साधने जवळ बाळगावीत, मग सोने-नाणे दूरच, अशी बुद्धाची आज्ञा होती. पण आपण पाहातो की, अजंठ्यातील बुद्धमूर्तींनी रत्नजडित मुकुट घातले आहेत आणि त्या मूर्ती अतिशय किंमती आसनांवर बसलेल्या आहेत.

तीच गोष्ट सैन्य व लढाया यांची. बौद्धधर्माच्या शिकवणुकीमुळे अशोकाला युद्धाविषयी तिरस्कार वाटू लागला व त्याने शांततेचा रस्ता धरला. त्याच्या शिलालेखांवरून असे क़ळते की, तो सैन्याचा उपयोग संचलनासाठी व देखाव्यासाठी करत असे. पण सूर्यदेव व महेश्वर यांची पूजा व बौद्धधर्म यांची सांगड हर्षाने जितक्या सहजपणे घातली होती तितक्याच सफाईने त्याने बौद्धधर्म व युद्ध यांची जोडी जमवली होती. हर्षाने सतत तीस वर्षे आक्रमक युद्धांचा धिंगाणा चालवला. कारकिर्दीच्या अखेरीला त्याच्याकडे साठ हजार हत्ती, एक लाख घोडेस्वार व प्रचंड पायदळ होते. एकदा एका मारेकऱ्याने हर्षावर हल्ला केला, तेव्हा त्याला निःशस्त्र करून, पकडून राजसभेत आणले. सर्वांनी एकमुखाने सांगितले की, याला ठार करावे. पण हर्षाने त्याला माफ केले. इतके औदार्य हर्षाच्या ठिकाणी बुद्धाच्या उपदेशामुळे आले होते. पण त्याची युद्धे व त्यानंतरचे विजयोत्सव यांच्या खर्चासाठी कर देऊन मेटाकुटीला आलेल्या सामान्य माणसाला असेच वाटत असले पाहिजे की, एक वेळ मारेकऱ्याला माफ न केले तरी चालेल पण लढाया आणि त्यातील मनुष्यहत्या थांबवा.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

थोडक्यात, बौद्धधर्म हा एक खर्चिक धर्म होऊन बसला होता. अगणित मठ व त्यातून राहाणारे लाडावलेले भिक्षू यांची तुलना मोठ्या खर्चाने उभ्या केलेल्या सैन्याशीच होऊ शकेल. प्रथमपासून बौद्ध धर्माने एकछत्री साम्राज्याचा पुरस्कार केला होता. लहान लहान राज्यांतून सतत चालणारे झगडे त्यामुळे थांबतील, अशी त्यामागची अपेक्षा होती. खुद्द बुद्धाला चक्रवर्ती म्हणजे आध्यात्मिक क्षेत्रातला सम्राट असे म्हटले आहे. पण अशी एकछत्री व विस्तृत साम्राज्ये, समाजाच्या नवीन रचनेत, परवडणारी राहिली नव्हती. जुन्या सम्राटांच्या परंपरेतील हर्ष हा शेवटचा सम्राट. त्यानंतर लहान लहान राज्ये असण्याचा काळ आला. पुढील जमीनदारी (फ्यूडल) युगात स्थानिक देशमुखांना सामावून घेत पुनः साम्राज्ये उभी राहिली. जमीनदारांच्या उतरंडीच्या हातात प्रशासन राहिले व साम्राज्यांची घडण खालून वर अशी बनत गेली. स्थानिक जमीनदारांना नव्या जमीनदारी युगाला साजतील असे जमिनीच्या वतनाचे अधिकार मिळाले.

(हर्षादिकांची) साम्राज्य लालसा व साम्राज्याला आधार देणारा बौद्धधर्म या दोघांचाही पराभव 'खेडेगाव' या नव्या संस्थेने केला. इथून पुढे स्वयंपूर्ण खेडेगाव हा समाजातील उत्पादनाचा मुख्य घटक बनून राहिला. प्रशासन स्थानिक पातळीवर धान्याच्या किंवा वस्तूच्या रूपात कर गोळा करू लागले व हा साठा स्थानिक पातळीवरच वापरून टाकू लागले. वस्तूचे पैशात रूपांतर होण्यासाठी मजबूत व्यापार असायला हवा; असा व्यापार आटून गेला होता. मध्ययुगीन भारतात परिस्थिती अशी होती की, धान्य व कच्चा माल लांब अंतरावर वाहून नेणे अवघड झाले होते. हर्षाच्या काळी स्थिती अशी नव्हती. तो आपला सारा दरबार आणि सैन्य घेऊन साम्राज्यभर हिंडत असे. चिनी प्रवाशाने (हुएन च्यांग) असे लिहून ठेवले आहे की, हिंदुस्थानातील लोक व्यापारासाठी नाण्यांचा फारसा उपयोग करीत नाहीत; वस्तुविनिमयातून व्यवहार चालवितात. हर्षाने पाडलेली नाणी अजिबात सापडत नाहीत यावरून हे खरे असावे. उलट, मौर्य काळातली नाणी भरपूर सापडतात.

बौद्ध धर्माला सुरुवातीला जे यश मिळाले त्याचे कारण त्याने एक महत्त्वाची सामाजिक गरज भागविली, हे होते. बौद्धधर्माचा उदय झाला (इ.स.पू. ६०० वर्षे) त्या काळात गंगेच्या खोऱ्यातला समाज खेड्या-खेड्यातून विखुरला नव्हता. लोकांच्या टोळ्या होत्या आणि त्या टोळ्या आपसात सारख्या झगडत असत. त्यातील काही टोळ्यांना तर नांगर व शेतीही माहीत नव्हती. या मूलतः गोपालक व फिरत्या टोळ्यांची धर्माची गरज वैदिक धर्माने भागवली होती. परंतु जशा या टोळ्या शेतीवर स्थिरावल्या तशा त्यांना पशुबळी देणारे यज्ञ परवडेनासे झाले. मौर्यांच्या आधीची जी अर्थव्यवस्था होती तीत धातू, मीठ, कापड इत्यादी वस्तू दूर अंतरावर नेऊन व्यापार करणे याला महत्त्व होते. त्यासाठी सामर्थ्यशाली आणि विस्तृत साम्राज्य असणे हे गरजेचे होते. टोळ्यांच्या संघापासून एकसंध समाज निर्माण होण्यासाठी नव्या तत्त्वज्ञानाची जरूरी होती.

मगधामध्ये एकाच वेळी विस्तृत समाजावरील एकछत्री राज्य व त्या समाजाचा एकजिनसी धर्म यांची स्थापना झाली. यावरून साम्राज्य व सार्वत्रिक (युनिव्हर्सल) धर्म हे परस्परांना समांतर असतात, असे सिद्ध होते. केवळ बौद्धातीच नव्हे तर जैन, अजिविक इ. पंथानी देखील यज्ञभाग व त्यात दिले जाणारे पशुबळी यांच्या युक्तिसिद्धतेबद्दल शंका घेतली होती. अरण्यातील टोळ्यांपासून व्यापाऱ्यांचे संरक्षण व्हावे यासाठी बौद्धांनी तरतुदी केल्या होत्या. जुन्नर, कारले, नाशिक, अजंठा अशा, जेथे व्यापारी वाटा एकत्र मिळत त्या ठिकाणी त्यांनी मठ स्थापिले होते, यावरून ही गोष्ट सिद्ध होते.

बौद्ध धर्माचे मुख्य सांस्कृतिक कार्य इसवी सनाच्या शतकाच्या अखेरीला आटोपले होते. अहिंसेचे पालन प्रत्यक्ष व्यवहारात किती होत असेल ते असो, पण अहिंसेला सार्वत्रिक मान्यता मिळाली होती. यज्ञयागात पशूंचे बळी देण्याची प्रथा संपली होती. एखाद-दुसरा राजा यज्ञ करीत असेलही पण अर्थव्यवस्थेला त्यामुळे हानी पोचत नव्हती. (समाजापुढील) मुख्य प्रश्न असा होता की, फारशी जबरदस्ती करावी न लागता खेड्यात होणाऱ्या अतिरिक्त उत्पादनावर मध्यवर्ती सत्तेने ताबा कसा मिळवायचा.

इथे देखील धर्मच उपयोगाला आला. पण तो बौद्धधर्म नव्हता. बौद्धधर्माला जातिभेदाचा तिरस्कार होता. पण खेडेगावातील वस्तीची जातवार विभागणी झाली होती. पूर्वी असलेल्या फिरत्या टोळ्या खेड्यात परस्परांच्या शेजारी येऊन राहिल्या होत्या व प्रत्येक टोळीची एक जात झाली होती. टोळीवाला काय किंवा खेडूत काय, प्रत्येकाला धर्मकृत्यासाठी पुरोहित लागत असत व बौद्धभिक्षूंना पौरोहित्य करण्याची मनाई होती. पौरोहित्य ही ब्राह्मणांचीच मक्तेदारी होती.

पान ३३ वर पुढे चालू...









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# चर्चा*

## प्रा. शांताराम कुलकर्णी

डॉ. वि.रा. करंदीकर यांच्या *'कुणा यात्रिकाचा जीवनसंवाद'* या आत्मचरित्रपर पुस्तकावर सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. म.द. हातकणंगलेकर यांनी लिहिलेले परीक्षण *'नवभारत'* मासिकात आले आहे. ते वाचून सुचलेले काही विचार पुढे मांडीत आहे.

समीक्षेची सुरवात करताना प्रा. म.द.हां.नी करंदीकरांच्या व्यक्तिमत्त्वाचे काही पैलू सांगितले आहेत. आपला व करंदीकरांचा स्नेह, मैत्री, जवळीक या गोष्टी त्यांनी नोंदल्या आहेत. पण त्यातील एका वाक्याचा उलगडा होत नाही. "सहाशे पृष्ठांचे आत्मवृत्त वाचकांना व ध्येयवादी तरुणांना सादर केले आहे, हे त्यांच्या जीवनाचे साफल्य आहे हे मान्य करावयास पाहिजे." येथे समीक्षकांना नेमके काय म्हणावयाचे आहे? अनेकांच्या आग्रहावरून हे आत्मवृत्त लिहिले गेले आहे हे मान्य! त्यापासून कोणी काही उचलले तर ते त्या पुस्तकाचे श्रेय म्हणता येईल? पण असे काही व्हावेच असा प्रचारकी हेतू करंदीकरांचा होता असे दिसत नाही. दुसरे — "वयाच्या आठव्या (नवव्या?) दशकात हे कार्य पार पाडल्यामुळे त्यांच्या जीवनाचे साफल्य झाले" म्हणजे हे लेखन केल्यामुळे करंदीकर कृतकृत्य झाले असा अर्थ घ्यावा काय? साफल्य कशामुळे येते? जीवन सत्कारणी लावल्यामुळे की त्याचा 'वृत्तांत' सादर केल्यामुळे? तरीपण प्रा.म.द.हां.ना अर्धशतकाचा सुहृद या नात्याने वाटणारा आनंद लोभसवाणा आहे! करंदीकरांची स्वभाववैशिष्ट्ये सांगताना 'म.द.हा.' सांगतात की, आपणा दोघांच्या स्वभावात भिन्नता असूनही मैत्री झाली कारण करंदीकरांचे काही अद्वितीय गुण!

करंदीकरांच्या उदारमताबद्दल लिहिताना, भिन्न मतांच्या सुरींचा उल्लेख त्यांनी केला आहे. त्यामध्ये आचार्य भागवत, अ.भि. शहा, मे.पुं. रेगे, प्रभाकर पाध्ये, प्रा. दाभोळकर अशी मातबर नावे आहेत. करंदीकर प्रखर हिंदुत्वनिष्ठ आहेत. त्यांची त्यावरील श्रद्धा अविचल आहे. पण या संदर्भात 'म.द.हा.' म्हणतात, "त्यांनी आपल्या कर्मठ हिंदुत्ववादाला मुरड घालून औदार्य दाखवले....!" येथे कर्मठपणाचा अर्थ काय घ्यावा? एखाद्या तत्त्वावरील अविचल निष्ठा आणि कर्मठपणा या संकल्पना वेगळ्या आहेत हे प्रा. 'म.द.हां'ना माझ्यासारख्या त्यांच्या विद्यार्थ्याने समजावून सांगावे का? कर्मठपणाचे अंगभूत स्वरूप म्हणजे अंधश्रद्धा व बरेचसे अज्ञान! जोडीला अभिनिवेश व अत्याग्रही वृत्ती! करंदीकरांच्या आसपासही कर्मठपणाची ही लक्षणे फिरकताना दिसत नाहीत. मग 'मदहा' कशाच्या आधारावर त्यांना कर्मठ म्हणतात? त्यांनी दिलेल्या श्रेष्ठींच्या नामावलीत एकही व्यक्ती हिंदुत्ववादी नाही. असले तर काहीजण विरोधी सूर लावणारेच आहेत. अशांचे आदरातिथ्य करणारे व मैत्री मिळवणारे करंदीकर केवळ हिंदुत्ववादी म्हणून त्यांना कर्मठ ठरवणे वा म्हणणे, हे अनाकलनीय आहे!

"डॉ. करंदीकरांनी वामनपंडित, ज्ञानेश्वर, रामदास, रामकृष्ण व विवेकानंद असा आपल्या अध्यात्माच्या अभ्यासाचा प्रवास केला. शेवटी ते विवेकानंदांच्या विचारापाशी येऊन थांबल्याचे दिसते" असे 'मदहा' सांगतात. इथे बरीच गफलत झाली आहे. करंदीकरांचा हा प्रवास विवेकानंद, रामकृष्ण, वामनपंडित, ज्ञानदेव, समर्थ रामदास असा आहे. हे त्यांचे चरित्र वाचताना स्पष्ट दिसते. 'वयाच्या केवळ सोळाव्या वर्षी विवेकानंदांचा प्रभाव पडला' असे करंदीकर स्वच्छपणे म्हणतात. डॉ. करंदीकरांच्या काही पुस्तकांचा व तद्विषयक कार्याचा तपशील म.द.हा. सांगतात. एका पुस्तकाचे इंग्रजीत भाषांतर झाल्याचेही सांगतात. पण हे भाषांतर आपणच केले आहे हे ते सांगत नाहीत. हेतू काय? पुढे ते म्हणतात, "त्यांच्या कृपाप्रसादाने त्यांना इंग्लंड/अमेरिकेचा प्रवास करता आला." हे फारच संदिग्ध लिहिणे आहे. यातील शब्दयोजनेमुळे करंदीकरां-बद्दल गैरसमज होण्याचा संभव आहे. कृपाप्रसादात कोणाच्या तरी उपकाराची झाक दिसते. कृपाकर्त्याचे औदार्य तर ती

---

* 'कुणा यात्रिकाचा जीवनसंवाद' या आत्मचरित्राचे प्रा. हातकणंगलेकर यांनी केलेले परीक्षण मागील अंकात प्रसिद्ध केले होते. त्याविषयी केलेली चर्चा.




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कृपा घेणाऱ्याचा काहीसा कमीपणा दिसतो. करंदीकर कुणाच्यां कृपेने एखादी गोष्ट पदरात पाडून घेतील हे असंभवनीय आहे. तर्कतीर्थांशी झालेला प्रबंधासंबंधीचा पत्रव्यवहार, सांगलीच्या राजेसाहेबांकडून न मिळालेले ग्रंथपारितोषिक, डॉ. माईणकरां-सारख्यांनी त्या संदर्भात घेतलेली भूमिका अशी अनेक उदाहरणे या संदर्भात नोंदविता येतील.

डी. ई. सोसायटीतील करंदीकरांच्या कार्याचा आढावा घेताना, 'मदहां'नी फार हात राखून लिहिले आहे. हा एकपरीने करंदीकरांच्यावर अन्याय आहे. 'मदहा'देखील सोसायटीचे आजीव सदस्य होते. विलिंग्डन महाविद्यालयाचे प्राचार्य होते. करंदीकरांनी केलेल्या उल्लेखनीय कामगिऱ्या कोणत्या? त्यापैकी, 'मदहां'ना भावलेल्या कोणत्या? कोणत्या ठिकाणी 'मदहां'चे सहकार्य करंदीकरांना लाभले? कनिष्ठ कर्मचाऱ्यांबद्दल वाटणारी त्यांची आस्था मात्र त्यांनी नमूद केली आहे. पण 'मदहां'नी ती केवळ कौतुक म्हणून पाहिली की करंदीकरांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक घटक म्हणून पाहिली? करंदीकरांच्या ठायी असणारी ही सक्रिय जाण अन्य किती सहकाऱ्यात आढळून आली होती? इतरही अनेक घटनांचे 'मदहा' प्रत्यक्षदर्शी साक्षीदार आहेत. पण अशा घटनांचा साधा निर्देशही ते करीत नाहीत. त्यांनी, समीक्षक व सहकारी या दोन्ही नात्यांनी होणारी त्यांची प्रतिक्रिया द्यायला हवी होती. अशी प्रतिक्रिया या समीक्षेला एक उंची देऊन गेली असती.

'जीवनसंवाद' या नावाला 'मदहां'चा विरोध आहे. त्यांना हा जीवनवृत्तांत वाटतो. वस्तुतः 'ठीक आहे! तुमचे मत तसे आहे का? असू दे!' एवढ्यावर हा मुद्दा सोडून देता आला असता. पण करंदीकरांचीही काही बाजू असू शकते. त्यांना हेच नाव द्यावे असे का वाटले असावे? शब्दांच्या योजनेबद्दल करंदीकर अत्यंत काटेकोर आहेत. त्यांच्या नेहमीच्या बोलण्यात व लिहिण्यात 'पार्श्वभूमी' हा शब्द कधीही येत नाही. ते "पृष्ठभूमी" म्हणतात. 'दूरध्वनी' म्हणत नाहीत तर 'दूरभाष्' म्हणतात. उपरोक्त म्हणत नाहीत, उपर्युक्त म्हणतात. त्यांना संवाद व वृत्तांत यातला फरक वा अर्थच्छटा माहीत नाहीत असे म्हणावे काय? किंवा वृत्तांत याऐवजी संवाद हा शब्द त्यांनी ढिसाळपणे वापरला आहे असे म्हणावे का? दोन्हीही नाही. माणूस आत्मवृत्त लिहितो म्हणजे काय करतो? कोणी ज्ञानेश्वरी या विषयावर बोलतो वा लिहितो तेव्हा तो आपल्या शक्ती व बुद्धीनुसार, ज्ञानेश्वरांऐवजी बोलत असतो. कोणी दुसऱ्याचे चरित्र लिहित असेल तर तो त्या दुसऱ्याऐवजी लिहित असतो. पण आत्मवृत्त लिहिणाऱ्याने कोणाशी बोलावे? हे स्वतःच स्वतःशी संवाद करीत लिहावे लागते. स्वतःला प्रश्न विचारून स्वतःच उत्तरे द्यावी लागतात. काहीवेळा फक्त हकीगत सांगावी लागते. त्यावर काही बोलले जात नाही. हे 'शब्देविण संवादिजे' आत्मवृत्तातच असू शकते. म्हणून आत्मवृत्त एकप्रकारे आत्मसंवादच असतो. आत्मवृत्त म्हणजे पी.टी.आय.ची बातमी नव्हे! वृत्तांत लेखनात जसे घडले तसेच सांगावे लागते. त्यात स्वातंत्र्य असत नाही. संवादात हे घेता येते. ते किती, कधी व कुठे घ्यायचे याचे तारतम्य बाळगणे हा एक सुसंस्कृतपणाचा भाग आहे! 'माझे भांडण झाले' एवढ्यावर एक प्रसंग संपविता येतो. भांडणात वापरलेले शब्द सांगण्याची आवश्यकता नसते. करंदीकरांचे पुस्तक घटनांची जंत्री वाटत नाही. समोर बसून ते सांगत आहेत असे वाटते. (एक विचारणा – 'म. गांधींचे 'सत्याचे प्रयोग' हा जीवनसंवाद म्हणावा की, जीवन वृत्तांत?) पण या सर्वांहून महत्त्वाचा मुद्दा हा की, जीवनसंवाद या शब्दाने आपल्याला काय अभिप्रेत आहे हे करंदीकरांनी पान ५२२ वर एका स्वतंत्र परिच्छेदात स्पष्ट केले आहे. 'मदहां'चे त्याकडे दुर्लक्ष झालेले दिसते. जिज्ञासूंनी हा परिच्छेद मुळातूनच वाचावा.

डॉ. करंदीकरांनी लिहिलेल्या या आत्मचरित्राचा आधार म्हटलेल्या दैनंदिनीबाबत 'मदहां'नी केलेली विधाने गोंधळात टाकतात. चौदा वर्षांचा अपवाद वगळता, अव्याहतपणे साठ वर्षे प्रतिदिन लिहिलेल्या दैनंदिनीचा करंदीकरांना खूप उपयोग झाला. तिचा उपयोग करता आल्यामुळे सत्याचा अपलाप झाला नाही असा त्यांचा दावा आहे. यात चूक काय आहे? पुढे केव्हातरी आपणाला आत्मवृत्त लिहायचे आहे असे ठरवून काही ही दैनंदिनी लिहिलेली नाही. त्यामुळे स्वतःपुरतीच लिहिलेली ही दैनंदिनी असत्यापासून दूर राहाते. प्रा. मे.पुं. रेगे यांनी नमूद केलेल्या करंदीकरांच्या विविध गुणांचे दर्शन या दैनंदिनीत होत असेल तर ती सत्यदर्शीच असली पाहिजे. मग "सत्य हे व्यक्तिसापेक्ष असू शकते. ते अंतिम सत्य आहे असे म्हणता येतेच असे नाही" या 'मदहां'च्या वाक्याचा काय अर्थ घ्यायचा? करंदीकरांनी स्वतःला फायदेशीर होतील अशाच गोष्टी त्यात लिहील्या असा त्याचा अर्थ होईल! तसे असेल तर ती लबाडी होईल! आणि मग, मे.पुं. रेगे म्हणतात त्या गुणांचे दर्शन करंदीकरांच्या एकूण जीवनात दिसणार नाही.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे प्रा. रेगेही लबाडच ठरतील! एकूणच, ज्याच्या आधारावर हे पुस्तक लिहिण्याचा प्रपंच मांडला, त्या आधारावरच शंका घेतल्यास, त्या पुस्तकाची योग्यता काय समजावयाची? दैनंदिनी हा आत्मसंवादच असतो. मग, 'मी माझ्याशीच खोटे बोलतो आहे' असे कोणी म्हटले तर पुढचे बोलणेच खुंटते! आणखी म्हणजे — अंतिम सत्य म्हणताना 'मदहां'ना कोणता अर्थ अभिप्रेत आहे? 'अथातो ब्रह्मजिज्ञासा' हा की व्यवहारातला? याच परिच्छेदात सौ. शांतावहिनी व करंदीकरांची कविता यावर 'मदहा' जे लिहितात ते वरील मजकुराच्या सुराशी सूर जुळवणारे वाटत नाही.

करंदीकरांच्या कौटुंबिक पृष्ठभूमीवर लिहिताना 'मदहां'नी जे लिहिले आहे त्यातील दोन वाक्ये उल्लेखनीय आहेत. "दीर्घायुष्य हे पुरुषार्थाचे गमक आहे असे करंदीकराना वाटते." हे वाक्य. आत्मवृत्तातील हा भाग पुन्हा वाचला तेव्हा असे काही म्हटल्याचे आढळले नाही. त्यांनी अनेकांच्या दीर्घायुष्याचा उल्लेख केला आहे हे मान्य! पण म्हणून तो 'पुरुषार्थाचे गमक' या अर्थी घ्यायचा का? दीर्घायुष्याचे रहस्य काय या प्रश्नाचे उत्तर एखादा मिस्कील माणूस – 'अधेमधेच न मरता सलगपणे जिवंत राहिलो' असेही देईल! याचा पुरुषार्थाशी काय संबंध येतो? हा निष्कर्ष 'मदहा' कशाच्या आधारावर काढतात ते समजत नाही. दुसरे वाक्य आहे — 'व्यवहारी समन्वय साधण्याची वृत्ती उतारवयात त्यांच्यात उतरली असावी.' उतारवयात याचा अर्थ काय? वयाच्या अठराव्या वर्षापासून आपण व्यवहारात, समाजात, मित्रपरिवारात कसे वागलो हे करंदीकरांनी स्पष्टपणे लिहिले आहे. सामान्य माणसाप्रमाणे त्यांचे जगणे व वागणे व्यवहारी नव्हते. तो व्यवहार कौटुंबिक परिस्थितीने व त्यांच्या स्वभाव-वैशिष्ट्यांमुळे त्यांना जमला नाही. या पूर्वायुष्यात औदार्याला वावच नव्हता. पण लौकिक व्यवहाराशी समन्वय साधला नसता तर त्यांना काहीच करता आले नसते. करंदीकरांची 'मोहन करंदीकर' ही पूर्वायुष्यातली प्रतिमा जवळून पाहिलेले कित्येकजण आजही हयात आहेत. समन्वयाला दुसरा व्यावहारिक शब्द 'तडजोड' हा आहे! ही तडजोड वा समन्वय त्यांनी उतारवयात साधला म्हटले तर पूर्वायुष्यात ते फार 'असमन्वयक' होते असे म्हणावे लागेल. एक मान्य आहे की, तत्त्वाशी वा सत्याशी प्रतारणा करून करंदीकरांनी जशा पूर्वायुष्यात कसल्याही तडजोडी केल्या नाहीत, तशा त्या पुढील आयुष्यातही केलेल्या नाहीत. ना घराशी, ना नोकरीच्या काळातल्या सहकाऱ्यांशी, ना कोणा उच्चपदस्थाशी! शंकरराव देवांबरोबरचा रेल्वे प्रवास व त्यावेळचा संवाद, किंवा विवेकानंदांवरील व्याख्यानांमुळे प्रभावित झालेल्या श्रीमंत सांगलीकरांचा जेवणासाठीचा आग्रह ही दोन उदाहरणे पुरेशी आहेत. समन्वय म्हणजे पडते घेणे असा अर्थ घेतला तर ते आजही तत्त्वाशी वा विचारांशी त्या अर्थाची तडजोड करणार नाहीत. मग 'मदहां'ना अभिप्रेत असलेली ही उतारवयातली समन्वय वृत्ती कोणती? भिन्न मतांच्या श्रेष्ठींशी मैत्री? पण पूर्वायुष्यातही त्यांनी भिन्न मतांच्या लोकांशी वैर धरल्याचे दिसत नाही. समन्वयाची ही वृत्ती साधण्यापूर्वी काय होते व आता काय आहे असे नेमक्या उदाहरणाने सांगितले असते तर समजण्यास सोपे गेले असते.

ज्या कौटुंबिक वातावरणातून व परिस्थितीतून करंदीकर आजच्या जागी पोचले तो मार्ग खडतर आहे. एका गोष्टीचा स्पष्ट उल्लेख हवा होता – तत्त्वनिष्ठ माणसे व्यवहारात अपयशी ठरण्याचे प्रमाण ९९.९९% आहे. कारण व्यवहार व तत्त्वनिष्ठा एकत्र नांदत नाहीत. अशा माणसांचा एक केविलवाणा आचार्य (तुझे आहे तुजपाशी) होतो. तत्त्वाचे पालन करताना कित्येकदा नुकसान व प्रसंगी मानहानीही सोसावी लागते. करंदीकरांचे मोठेपण हे की, तत्त्वांच्या पालनात काडीचीही कसूर न करता, त्यांनी लौकीक व्यवहारही तितक्याच उत्तमप्रकारे यशस्वी केला आहे! प्रा. 'मदहां'ना हे भरभरून मांडता आले असते. पण उलट 'व्यवहाराची मर्यादा पाळताना औदार्याचा संकोच झाला तर तो दोष मानू नये' असे ते म्हणतात. 'मदहां'ना करंदीकरांकडून कोणत्या औदार्याची अपेक्षा आहे, की जी त्यांनी पूर्ण केली नाही? शिवाय कोणत्या वेळी औदार्य दाखवावे व कोणत्या वेळी व्यवहार पहावा याची युक्तायुक्तता करंदीकरच ठरवू शकतात. आणि ते तारतम्य त्यांनी सांभाळले नाही असे म्हणणे म्हणजे वास्तवाकडे डोळेझाक करण्यासारखे आहे.

मसूराश्रमातील अनुभवाबद्दल करंदीकरांनी विचारमंथन केले नाही असे 'मदहा' म्हणतात. मसूरकर महाराजांच्या वर्तनाकडे करंदीकरांनी दुर्लक्ष करायला हवे होते असा त्यांचा स्पष्ट कल दिसतो. त्यासाठी करंदीकरांना नेपोलियनबद्दल वाटणाऱ्या आदराचा ते उल्लेख करतात. मसूरकरांनाही अशी सवलत द्यायला हवी असे 'मदहां'चे म्हणणे! असे स्पष्ट म्हणावे लागते की, हे एक लंगडे प्रतिपादन आहे! मसूरकर महाराज व नेपोलियन यांचे मूलभूत कार्यक्षेत्रच वेगळे आहे. त्यांची







अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तुलना करता येणार नाही. ज्या क्षेत्रात मसूरकर महाराज होते त्यात 'स्त्रीपुरुष संबंध' हा सर्वोच्च महत्त्वाचा विषय आहे. तत्त्वज्ञान, नैतिकता, चारित्र्यसंवर्धन यांवर अधिकारवाणीने बोलणाऱ्या माणसाने एखाद्या स्त्रीशी सूत जमविणे व कोणा संगीतकाराने पार्श्वगायिकेशी छुपा घरोबा करणे यांत कमालीचे अंतर आहे. करंदीकरांना नेपोलियनबद्दल आदर का वाटतो? इ.स. पूर्वी २०० वर्षे हॅनिबॉलने सैन्यासह आल्प्स पर्वत ओलांडला. त्यानंतर सुमारे २००० वर्षांनी तोच पराक्रम नेपोलियनने केला. जगाच्या इतिहासात हा विक्रम करणारे हे दोघेच आहेत. हे आदराचे कारण असू शकेल की नाही? वॅलेवस्का वा जोसेफाईन प्रकरणाने तो कमी व्हायचे कारण नाही. मसूरकरांची गोष्टच वेगळी होती. विश्वामित्र-मेनका, पराशर-मत्स्यगंधा ही प्रकरणे काय सांगतात? मसूरकर आणि त्या दोन महिला! सांगणे एक, वागणे दुसरेच! उपदेश काय, वर्तन कोणते? हे विरोधी वर्तन धक्कादायकच असते. त्याचा परीणाम करंदीकरांच्यावर झाला असेल तर त्यांना आजकालच्या 'सैल चारित्र्यांच्या कल्पनांचा' घुटका कशासाठी द्यायचा? 'स्त्रीपुरुष संबंध हाच एकमेव चारित्र्य संपन्नतेचा निकष आहे, अशी त्यांची धारणा बनली!' ठीक, पण मग, श्रीरामाचे एकपत्नीव्रत ही जर करंदीकरांच्या मते सर्वोच्च नैतिकता असेल, तर शिवाजी व कृष्ण यांच्याबद्दल त्यांनी कोणत्या भाषेत बोलावे? तसे ते का बोलत नाहीत? "करंदीकरांचे निकष वर्गीय चौकटीतले आहेत" हे विधानही पूर्वग्रहदुषित म्हणावे लागते. हा वर्ग कोणता? करंदीकर ब्राह्मण आहेत. त्या वर्गात बाह्यसंबंध तुलनेने कमी असतात. त्यामुळे त्यांचे चारित्र्याचे निकषही काहीसे वेगळे असतात. करंदीकर त्या वर्गातले म्हणून त्याच पठडीतले आहेत हे म्हणणे तर्कसंगत नाही. चारित्र्याचा ठेका घाऊकरित्या कोणी घेतलेला नसतो. ही कंत्राटी पद्धत नाही. हे निकष ज्याचे त्यानेच ठरवायचे असतात. करंदीकरांनी स्वत:पुरते काही निकष ठरवले असतील तर त्यात दोष कोणता? एखादा ब्राह्मण व जैनधर्मिय सामिष अन्न खातो तर एखादा ज्यू वा इस्लामधर्मीय पूर्ण शाकाहारी असू शकतो. म्हणजे दोघेही जण चारित्र्यहीन म्हणावयाचे का? दुसरी गोष्ट – 'स्वार्थ, भ्रष्टाचार, गैरमार्गी संपत्ती, सत्तेचा गैरवापर, पददलितांवरील अन्याय, अत्याचार व पिळवणूक या गोष्टी चारित्र्यहीनतेच्या' नाहीत असे करंदीकर कधी व कुठे म्हणाले आहेत? तशा कोणत्या गोष्टींची भलावण त्यांनी केली आहे? उलट याविरुद्ध ते एकाकी लढले आहेत. बहुसंख्य बोलघेवड्या माणसांनी त्यांची ठामपणाने पाठराखण केलेली नाही. हे सत्य प्रा. 'मदहा'नाकारू शकतात का?

"परंपरागत आर्थिक व सांस्कृतिक चौकट शाबूत ठेवून अंतर्गत सामंजस्याचा प्रयत्न काहींनी केला. (श्री. मधू देवल). करंदीकर त्यावर चिंतन करीत नाहीत. उलट हरिजनांना प्राचीन हिंदूजातिव्यवस्थेत शाबूत ठेवणे त्यांना योग्य वाटते." असे 'मदहां'नी म्हटले आहे. यावर काय लिहावे? हे विधान ते कशाच्या आधारावर करतात? माझ्या माहितीप्रमाणे करंदीकर कोणताही जातिभेद मानीत नाहीत, जानवे घालत नाहीत, हरिजनांसकट सर्व धर्मियांच्या घरी त्यांनी विनासंकोच अन्नग्रहण केले आहे, भोसले नावाच्या हरिजनाला संघशाखेचा मुख्यशिक्षक म्हणून प्रणाम केले आहेत, देवलांच्या समोर एका दलित विद्यार्थ्याने त्यांच्या पायावर मस्तक ठेवले आहे. वयाच्या केवळ अठराव्या वर्षी, त्यावेळी असणारा महारवाडा म्हणजे काय असते हे जाणून घेण्यासाठी खजूर-शेंगदाणे खाऊन महिनाभर फिरले आहेत व अखेर हताश होऊन थांबले आहेत, एका आंतरजातीय विवाहात – त्यातही ब्राह्मण वधू व हरिजन वर – त्यांनी कन्यादान केले आहे. याला 'एस्.एम्.' हे थोर समाजवादी नेते दुसरे साक्षीदार होते. आणखी काय काय करंदीकरांनी करायला हवे होते? आपण केलेल्या अशा गोष्टींचा साधा उल्लेखही त्यांनी कधी आपणहून केलेला नाही.

पुरोगामी विचारांना विरोध करणाऱ्या शक्ती उत्पन्न झाल्या असून अन्यायकारक सामाजिक चौकटीचा मूलभूत विचार ते करीत नाहीत. पुरोगामी विचारांना हिंसाचाराने संपवावे अशा प्रवृत्ती वाढत आहेत. कारण त्यांना ही सनातन चौकट बदलावी असे वाटत नाही" हे निरीक्षण व भाष्य किंवा चिंतन कोणाला उद्देशून आहे? हा रा.स्व. संघावरील हल्ला आहे का? तसे असेल तर, 'तीन सरसंघचालक' हे करंदीकरांचे पुस्तक काळजीपूर्वक वाचावे. संघ जाणून घेऊन बोलणे एक व न जाणता बोलणे दुसरे! मधू देवल व आप्पा पेंडसे यांचा संघाशी झालेला मतभेद व 'मदहां'चा संघाशी असलेला मतभेद यात जमीनअस्मानाचे अंतर आहे! हा संघावरील आक्षेप नसेल तर तो कोणावर आहे? हिंसाचाराचे समर्थन कोण करते? संघाने ते कधी व कुठे केले आहे? ही नाराजी व्यक्त करताना 'मदहा' समर्थकांचे नाव सांगत नाहीत. कोणाचे नाव – व्यक्ती व पक्ष – सांगितल्याने होणाऱ्या टीकेला तोंड द्यायला नको



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणून घेतलेली ही सावधगिरी म्हणावी का? बरे, हे पुरोगामी विचारांचे चिंतन करंदीकरांच्या संदर्भात घेतले म्हणावे तर एक प्रश्न पडतो. पुरोगामित्वाचे निकष तरी कोणते आहेत? धर्माला शिव्या देणे, देवाला रिटायर करा म्हणणे, स्त्रीयांनी कुंकू, बांगड्या वा मंगळसूत्र न वापरणे, पुरुषी पोशाख करणे, केस कापणे हेच आहेत का? हे करंदीकर करणार नाहीत. पण वागणूकीतला उदारपणा, परमतांचा आदर, वेडगळ समजूतींचा त्याग, कर्मकांडाचे स्तोम न माजवणे हेही निकष असतील तर करंदीकर प्रखर हिंदुत्ववादी असूनही अस्सल पुरोगामीच ठरतात. न्याय, समता, लोकशाही या गोष्टी संघाचे काम करूनही साधता येतात असे ते मानतात. अखेर संघकार्याच्या द्वारा काय साधावयाचे आहे हे सांगताना करंदीकर म्हणतात, 'राजकीय स्वातंत्र्य प्राप्त करून घेतले तरी व्यक्तिमात्राचे स्वातंत्र्य जपणे, समानतेचे मूल्य प्रत्यक्षात उतरवणे, त्यासाठी समाजरचनेतच मूलगामी बदल घडवून आणणे, सर्वांना समान संधी मिळणे, कोणावरही अन्याय न होणे, आणि या सर्व गोष्टींना आधारभूत होणारे राज्यशासन निर्माण होणे अशी कार्ये राहतात. ती साधल्यावरही राष्ट्र परम वैभवाला नेणे हे शिल्लक राहाते. हे दूरगामी ध्येय साध्य करणे ही संघाची अखेरची अपेक्षा आहे." ही वाक्ये इतकी स्पष्ट आहेत की त्यावर भाष्य करण्याचेही कारण नाही. (पृष्ठक्रमांक २६१)

" 'उदात्त गोष्टीसाठी प्रयत्न करावा पण मर्यादेबाहेर कोणतीही गोष्ट मनावर लादू नये' ही समज आली" असे करंदीकरांचे एक वाक्य 'मदहां'नी उद्धृत केले आहे. ही उदात्त गोष्ट कोणती? संघ की अध्यात्म? अशी समज आल्याने उदात्त वाटणाऱ्या संघाच्या कार्यापासून करंदीकर थोडेफार अलिप्त झाले याचा आनंद की, संतवाङ्मयाचे अवलोकन करूनही करंदीकर 'अध्यात्मिकविभूती' झाले नाहीत याचा निर्देश? करंदीकर ज्ञानेश्वरी जगले नाहीत असे 'मदहा' म्हणतात. म्हणजे अभ्यास असूनही आपल्या मर्यादा ओळखल्यामुळे ते पुढे गेले नाहीत असेही म्हणता येते. करंदीकरांच्या दुसऱ्या एका वाक्यावर मात्र ते काहीही लिहित नाहीत. 'गांधी हत्येमुळे संघकार्य मागे पडले' हे ते वाक्य. या वाक्यावर इतक्या विरोधी व विविध प्रतिक्रिया येतील की तो वादाचा विषय व्हावा. 'मदहां'नी मौन पाळले ते बरेच झाले!

विलिंग्डन महाविद्यालयात विद्यार्थी ते प्राध्यापक या नात्याने करंदीकरांनी व्यतीत केलेल्या दिवसांपासून ते निवृत्तीच्या काळापर्यंतच्या त्यांच्या कार्याचा, कर्तृत्वाचा, जीवनशैलीचा कर्तव्यपालनाचा आढावा 'मदहां'नी घेतला आहे. करंदीकरांनी विस्तृत स्वरूपात सोसायटीतील ज्या प्रकरणांचे तपशील दिले आहेत, ते 'मदहां'ना अनावश्यक वाटतात. निःपक्षपाती व न्यायप्रिय अशी स्वतःची प्रतिमा तयार करण्याचा त्याना तो प्रयत्न वाटतो. पण अशी प्रतिमा वाचकाच्या मनात तयार होत असेल व ती वास्तवाला धरून असेल तर त्यात आक्षेप घ्यावा असे काय आहे? करंदीकरांनी भ्रामक प्रतिमा उभी केलेली नाही. याचे साक्षीदार स्वतः 'मदहा'च आहेत. शिवाय आपल्या कृतीचे समर्थन कोण करीत नाही? स्वतः प्रा. 'मदहा' आपल्या एखाद्या कृतीचे समर्थन वेळ पडली तर करणार नाहीत का?

करंदीकरांची ग्रंथसंपदा सर्वमान्य आहे. वाचली गेली आहे. असे असताना त्यांनी याही पुस्तकात काही अध्यात्मपर चिंतन करायला हवे होते अशी 'मदहां'ची अपेक्षा आहे! पण करंदीकरांनी इतरत्र भरपूर लिहिले आहे, सांगितले आहे. इथे तसे न केल्याने ग्रंथाला उणेपणा आला असे होत नाही. 'मदहां'ना कविता अनावश्यक वाटतात. का? करंदीकर चांगले कवी आहेत व या परिचित कविता त्यांच्या आहेत हे अनेकांना पुस्तक वाचल्यावरच समजले. अध्यात्माचा त्यांचा अभ्यास जगजाहीर आहे. आपला हा एक पैलू लोकांना कळावा असे वाटले तर बिघडते कुठे? न पेक्षा करंदीकर कवीही आहेत हे कधीच समजले नसते.

*नवभारत*मधील समीक्षा लिहिताना 'मदहा' अडचणीत सापडले आहेत असे वाटते. वैचारीक व तात्त्विक भिन्नता आणि व्यक्तिगत अनुभव व दीर्घकाळची मैत्री यांची सांगड घालताना त्यांची ओढाताण झाली आहे. वैचारिक भिन्नतेवर झोडपावे तर व्यक्तिगत जिव्हाळा आडवा येतो आणि व्यक्तिगत अनुभव व मैत्रीवर बोलावे तर वैचारीक मतभेद विसरता येत नाहीत. अशा काहीशा शृंगापत्तीत – Critics Dilemma – प्रा. 'मदहा' सापडले असावेत.

करंदीकरांचे आत्मचरीत्र व विद्यार्थीदशेपासुन त्यांना पाहात आलेल्या व समीक्षक म्हणून मान्यता पावलेल्या 'मदहां'चा त्यावरील अभिप्राय! दोघांनाही जाणणाऱ्यांच्या फार मोठ्या अपेक्षा राहातात. त्यांच्या आयुष्यात घडलेल्या काही गोष्टी अशा आहेत की अन्यत्र त्या आढळणार नाहीत. बालपणीच त्यांना आलेले वडिलांचे अनुभव, भीषण दारिद्र्य, आईचे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हाल, वनवास, करंदीकरांनी तोडलेला कुटुंबाचा पाश, एकवेळ जेवून काढलेले दिवस, थोरामोठ्यांच्या भेटी व सहवास, पैसा व अधिकारपद यांविषयीची अनासक्ती, मान्यताप्राप्त व्यक्तीशी झालेले वैचारिक वाद, त्यांचा मित्रसंग्रह, त्यांची रसिकता, विविध विषयांवरील ग्रंथरचना, व्याख्याने, आणि या सर्वांतून सांभाळलेली प्रसिद्धीपराङ्मुखता या सगळ्या गोष्टी 'मदहां'ना ज्ञात आहेत. मतभेद नोंदवूनही 'मदहां'ना करंदीकरांचे एक सर्वस्पर्शी व्यक्तिचित्र उभे करता आले असते. उलट काही एकांगी व क्वचित् सूचकपणे, प्रतिकूल ग्रह होईल काय असे वाटणारी शब्दयोजना येते. करंदीकरांच्या ध्येयवादाचे पुरेसे दर्शन यातून होत नाही. त्यांनी करंदीकरांना ज्या गोष्टीबद्दल श्रेय दिले आहे त्याहून महत्त्वाच्या गोष्टी राहून गेल्या आहेत याची चुटपूट लागून राहाते.

डॉ. करंदीकरांना जवळून ओळखणाऱ्यांना काय वाटते ते सांगण्याचा हा प्रयत्न वा खटाटोप!

**

---

पान २७ वरून पुढे चालू...

ब्राह्मणाला नव्याने महत्त्व आले होते. तो नव्या संस्कृतीचा दूत होता. तो पंचांग सांगत होता. जमीन नांगरावी केव्हा, बी पेरावे केव्हा, पिकाची कापणी केव्हा करावी, यांचे मुहूर्त तो काढून देत होता. नवीन पिकांची त्याला माहिती होती व त्यांचा व्यापार कुठे जाऊन केला असता फायदेशीर होईल, हे तो सांगत असे. यज्ञयाग करणारे त्याचे पूर्वसूरी किंवा मठवासी भिक्षु यांच्याप्रमाणे तो समाजावर आर्थिक ओझे बनून राहिला नव्हता. बुद्धाला विष्णूचा एक अवतार मानून ब्राह्मण व बौद्ध यांच्यातील वैर मिटवता येणे शक्य होते. (इतके झाल्यावर) बौद्ध धर्म साहजिकपणे अस्त पावला.

यावरून एक महत्त्वाचा धडा मिळतो. गोड गळ्याला रियाझाची किंवा कौशल्याला सरावाची जशी गरज असते त्याप्रमाणे चांगले विचार संस्कार व शिकवण यांच्या सहाय्याने ताजे ठेवावे लागतात. समाजाच्या प्रगतीला विचारांमुळे हातभार लागतो किंवा नाही यावरून त्यांची किंमत ठरते.

टीपा : (अनुवादकाच्या)

१. हा निबंध दामोदर धर्मानंद कोसंबी यांच्या 'एक्झॅस्परेटिंग एसेज' या पुस्तकातून घेतला आहे. पुस्तकावर प्रकाशक वा प्रकाशन वर्ष दिलेले नाही.

२. या विषयाची जास्त माहिती कोसंबी यांच्या 'इंट्रोडक्शन टु द स्टडी ऑफ इंडियन हिस्टरी' या पुस्तकात मिळेल असे त्यांनी स्वतःच दिलेल्या टीपेत म्हटले आहे.

**



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# *नवभारत* मासिकाविषयी
# निवेदन

*नवभारत* हे वैचारिक मासिक प्राज्ञपाठशाळा मंडळा तर्फे गेली ५८ वर्षे प्रसिद्ध होत आहे. या मासिकास महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचा पुरस्कार आहे. प्रा. वि.म. बेडेकर, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, प्रा. मे.पुं. रेगे व श्री. वसंत पळशीकर असे विख्यात विचारवंत या मासिकाचे संपादक होते. महाराष्ट्रातील सर्व नामवंत संशोधक, अभ्यासक व विद्वान व्यक्तींनी या मासिकातून आपले लेखन प्रसिद्ध केले आहे.

मासिकाचा हीरक महोत्सव जवळच आलेला आहे, त्या निमित्ताने मासिकाला अधिक भरगच्च रूप यावे असा प्राज्ञपाठशाळा मंडळाचा हेतू आहे. महाराष्ट्रातील वैचारिक लेखक, चोखंदळ वाचक आणि या मासिकाविषयी आस्था बाळगणारे हितचिंतक यांच्या सहकार्याविना हे कार्य सिद्धीस जाणार नाही.

आपण या मासिकासंबंधी खालील प्रकारे सहकार्य करू शकता.

१. महाराष्ट्रात अनेक विषयांचा सखोल अभ्यास करणारे त्याबाबतीत संशोधन करणारे व सखोल चिंतन करण्याचा ज्यांना ध्यास आहे असे अनेक विद्वान आहेत. त्यांना आपले विचार मांडण्यासाठी *नवभारत* हे उत्तम व प्रतिष्ठीत व्यासपीठ आहे. संपादक मंडळ अशा साहित्याचे स्वागत करण्यास उत्सुक आहे. त्यास यथाशक्ती मानधनही दिले जाईल. हे साहित्य पूर्णपणे स्वतंत्र असले पाहिजे असे नाही. ग्रंथपरीक्षण, ग्रंथपरिचय, उत्तम लेखाचा अनुवाद अशा स्वरूपाचे लिखाणही प्रसिद्ध होईल.

२. या दर्जेदार मासिकाची वर्गणी वर्षाला फक्त रु. २००/- इतकी आहे. आपण स्वतः वर्गणीदार व्हावे व आपल्या परिचितांनाही वर्गणीदार होण्याचा आग्रह करावा. सर्वांना अतिशय वरच्या दर्जाचे लेख घरबसल्या वाचायला मिळतील.

३. *नवभारत* मासिकाच्या हितचिंतकांनी सदर मासिकासाठी जाहिराती मिळवून द्याव्यात. त्यातून या विचारपंथनाला मदत केल्याचे श्रेय मिळेल. जाहिरातीसाठी प्राज्ञपाठशाळा मंडळाशी पत्र व्यवहार करावा.

महाराष्ट्राच्या ग्रामीण भागातही उच्च शिक्षण घेतलेले लोक मोठ्या संख्येने आहेत. उत्कृष्ट विचारांचा साक्षेपी परामर्श घेण्याची हौस पुष्कळ लोकांना आहे. तथापि उत्तम पुस्तके त्यांना मिळण्याची शक्यता कमी असते व अवघड विषयांची चर्चा करण्याची संधी त्यांना मिळत नाही. अशा वाचकांसाठी *नवभारत* हे फारच उपयोगी मासिक आहे. त्यांच्या सहकार्याची मासिकाला नितांत आवश्यकता आहे.

**संपादक मंडळ**

***नवभारत***

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

# प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत : १ एप्रिल १९९७ पासून लागू

| | |
|---|---|
| ■ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ■ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ■ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | ६० रु. |
| ■ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | ५ रु. |
| ■ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदनग्रंथ** | ६० रु. |
| ■ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ४० रु. |
| ■ **तरंगयामिक व पुंजयामिक** । मा.ग. टोळे | १० रु. |
| ■ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | ८० रु. |
| ■ **वागीश्वरी** । डॉ. गो.के. भट | ४० रु. |
| ■ **प्रस्थानभेद** (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं.वा. लेले | २५ रु. |
| ■ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | १० रु. |
| ■ **इतिहासाचे तत्त्वज्ञान** (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ **दासशूद्रांची गुलामगिरी** (भाग २) । शरद् पाटील | १०० रु. |
| ■ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ■ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १०५ रु. |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ■ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प.ल. वैद्य | ३० रु. |
| ■ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे.पुं. रेगे | १६० रु. |
| ■ **पाच पुस्तक-परिक्षणे** । वा.म. कुलकर्णी | ४० रु. |
| ■ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | २० रु. |
| ■ **कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य** । रा.भा. पाटणकर | ८० रु. |
| ■ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि.के. वेडेकर | १५ रु. |
| ■ **आचार्य शं.द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार** | १०० रु. |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु. |
| ■ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे.पुं. रेगे | ८० रु. |
| ■ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु. |
| ■ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | ८० रु. |
| ■ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ■ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ■ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म.अ. मेहेंदळे | ५५० रु. |

*१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही. ३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.*

*संपर्कासाठी पत्ता :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**

मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई